# ब्रँडीची बाटली

## आणि इतर गोष्टी

प्रल्हाद केशव अत्रे

२ रु.

नवभारत प्रकाशन-संस्था, मुंबई ४

# ब्रँडीची बाटली

आज त्रिंबकराव नेहमीपेक्षां पुष्कळच लौकर खोलींत परतले. नाहींतर एऱ्हवीं ते सात वाजतां कसचे परत येतात! संध्याकाळीं साडे पांच वाजतां खांद्यावर छत्री टाकून हपिसांतून बाहेर पडल्यानंतर रस्त्याच्या कडेकडेनें रेंगाळत रेंगाळत चालूं लागावयाचें; प्रत्येक कोपऱ्यावर मागून टांगा येतो कीं काय आणि पुढून मोटार येते कीं काय, हें नीट पाहून मग वळण्याचें ठरावयाचें; आणि तसें कांहीं असेल तर एखाद्या दुकानाच्या फळीला बिलगून आणि धोतराचा बोंगा वर उचलून उभे रहायचे व शेजारीं उभ्या असलेल्या माणसाला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें 'हे पुण्याचे रस्ते म्हणजे—' असें त्रासिक चेहऱ्यानें अर्धवट पुटपुटायचे; वाटेंत 'गणेश मोफत वाचनालयां'त शिरून सकाळच्या 'ज्ञानप्रकाश' वर ओझरती नजर टाकावयाची व ताजा अंक असल्यास 'किर्लोस्कर-खबर' वाचावयाची; कारण, 'किर्लोस्कर-खबर' हें त्रिंबकरावांचें फार आवडतें मासिक. त्यांतील 'हमालाचा लक्षाधिश झाला!' 'फेरीवाल्याचा कारखानदार बनला!' या गोष्टी वाचून त्यांच्या मुडपलेल्या महत्त्वाकांक्षेला एक आठवडाभर तरी भयंकर चेव येत असे, आणि मग त्याच चालीवर 'कारकुनाचा हेडक्लार्क झाला!' हें पालुपद ते स्वत:शीं गुणगुणूं लागत. वाचनालयांतून बाहेर पडल्यावर मग मात्र ते आपल्या 'भैरवाश्रमा' कडे वळत; फक्त वाटेंत 'हलवायाच्या दत्ता' पुढें थोडेंसें थांबावयाचें व रस्त्यावर दाटीदाटीनें उभ्या असलेल्या भाविकांच्या खांद्यावरून मान उंचावून आणि पायांतला जोडा अर्धवट काढल्यासारखें करून दत्ताचें तोंड (अगर तोंडें) पहाण्याचा प्रयत्न करावयाचा व तो साधल्यास वैश्वदेव केल्याप्रमाणें डोळे झाकून ओंठ हलवल्या-

सारखें करावयाचें; फार झालें तर रस्त्यावरच्या झोळीवाल्या पोऱ्याकडून पैशाच्या उदबत्त्या खरेदी करावयाच्या; नाहींतर कोंपऱ्यावरच्या काष्ठौषधीच्या दुकानांतून अर्धा आण्याचें 'त्रिफळयांचें चूर्ण' विकत घ्यावयाचें; खाणावळींत गेल्यावर कोणाशीं न बोलतां एका ठराविक कोंपऱ्यांत बसून जेवायचें; 'काय, आज सावकाश?' असें मालकानें कधीं घोगऱ्या आवाजांत विचारलें तर उगीच दांत विचकून हंसल्यासारखें करावयाचें; जेवण झालें म्हणजे धोतराच्या सोग्यानें तोंड पुशीत मालकाच्या टेबलाजवळ जाऊन गेल्या आठवड्यांतले खाडे मांडले आहेत कीं नाहीं तें पहायचें किंवा टेबलावर ठेवलेल्या अल्युमीनियमच्या काळवंडलेल्या वाटींतली कातरलेली सुपारी तोंडांत टाकीत बाहेर पडावयाचें!

एवढा कार्यक्रम उरकून खोलींत परत येईपर्यंत सहज नऊ वाजावयाचे! त्रिंबकरावांच्या कुलुपाचा वर आवाज झाला, कीं त्यांच्या खालच्या खोलींत रहात असलेल्या ढेकणे मास्तरांनीं आपल्या घड्याळांत पहावें तों बहुतेक नऊ वाजून एकादें दुसरें मिनिट झालेलें असावयाचें किंवा कदाचित् एकादें मिनिट कमी असावयाचें, इतकेंच!

गेल्या आठ वर्षांत त्रिंबकरावांच्या या शिरस्त्यांत क्वचितच एकादे वेळीं खंड पडला असेल! पण आज मात्र ते सात वाजतांच खोलींत परतले. त्यांना जेवावयाचें नव्हतें तरी खाणावळींत खाडा सांगावयाला ते गेले नाहींत. आज त्यांना भूकच नव्हती. आणि पोटाकडे त्यांचें लक्षच नव्हतें मुळीं. खोलीचें कुलूप काढतांना ते स्वतःशींच एकदां हंसले. कारण नसतांना उगीच खाकरले व 'शाम चुनरिया दे दे मोरी' हें पद गुणगुणत ते आंत शिरले. 'शाम चुनरिया' हें पद त्रिंबकरावांचें अत्यंत आवडतें. कारण तेवढेंच पद त्यांना येत होतें. आणि त्या पदाच्या पहिल्या ओळीपलीकडे त्यांना पुढचा शब्दही ठाऊक नव्हता. ग्रामोफोनच्या तबकडीला चिरा पडला म्हणजे त्यांत 'नीडल्' अडकून त्याच त्या ओळीच्या जशा पुनरावृत्ति सुरू होतात, तद्वत् 'दे दे मोरी' येथपर्यंत त्रिंबकराव येऊन ठेपले, म्हणजे 'विष्णुसहस्रनामा'च्या चालीवर ते त्या शब्दांचें दळण स्वतःशींच किती वेळ तरी चालवीत बसत. खोलींत शिरल्यावर दिवा न लावतां तसेंच वळकटीला टेकून 'दे दे मोरी' करीत ते पडले. अंगांतला कोट देखील त्यांनीं काढला नाहीं.

आजचा दिवस त्रिंबकरावांच्या आयुष्यांत अपूर्व होता. 'काय योग असतात एकेक !' असें म्हातारी मंडळी माना हलवीत नेहमीं ज्या प्रसंगांना अनुलक्षून बोलत असतात, तसला एक प्रसंग त्यांच्या आयुष्यांत आज उगवला होता. आज ते एक 'स्थळ' पहावयास गेले होते.—दुसऱ्या कोणासाठीं नव्हे, स्वतःसाठींच.—त्रिंबकरावांचें अद्यापि लग्न झालें नव्हतें. तसा योगच अजून कधीं आला नव्हता. आणि येणार कसा ? लहानपणापासून ते दुसऱ्याच्या घरीं वारावर वाढलेले. जवळचें नातेवाईक असें कोणी नाहीं. कसेबसे 'स्कूल फायनल' पास होऊन पंचवीस रुपयांवर त्यांनीं आपल्या कारकुनी कारकीर्दीला सुरुवात केलेली; आज आठ वर्षांत त्यांच्या पगाराची मजल एकेचाळीस रुपयांवर येऊन ठेपली होती. तथापि, अजूनही ते 'टेंपरवारी' कारकुनांच्या यादींतच रेंगाळत होते. खाणावळीचे पंधरा रुपये, खोलीचे तीन रुपये, परकड, चार–पांच रुपये एवढा खर्च जाऊन त्यांच्या हातीं महिन्याकांठीं उरणार तें काय ? तरीसुद्धां एवढ्या काळांत त्यांनीं पोस्टाच्या सेव्हिंग्ज बँकेंत दोनशेंसत्तावन रुपये चौदा आणे शिल्लक कशीतरी सांठविलेली होती. लग्नाचें वय असेतोंपर्यंत जवळ पैसा नाहीं, पैसा जमवून साठवीपर्यंत लग्नाचें वय रहाणें शक्य नाहीं, एकूण आपल्या कपाळीं बाशिंगयोगच नाहीं अशा निराशेच्या विचारानें त्रिंबकराव स्वतःच्या लग्नाच्या बाबतींत आतांपर्यंत अगदीं उदासीन होते.

पण परवाचे दिवसापासून घडीच पालटली. संकटाची सूचना जशी आगाऊ मिळते तशी येणाऱ्या आनंदाचीं पावलेंहि आधींपासून वाजायला लागतात. त्या दिवशीं ऑफिसांत गेल्यावर उमेदवार कारकून कायम करण्याचा सरकारी हुकूम निघाला असल्याची गुप्त खबर गोविंदा पट्टेवाल्यानें त्यांच्या कानांत येऊन सांगितली. गोविंदा थोरल्या ऑफिसांत गेला होता कांहीं कामाला. तेथल्या पट्टेवाल्यानें त्याला सांगितलें. तेव्हां तें खोटें कसें असेल ? ही बातमी ऐकून त्रिंबकराव स्वतःवर इतके खूष झाले, कीं मधल्या सुटींत बाहेर पडतांच पहिल्या प्रथम त्यांनीं एक पैशाची पानपट्टी विकत घेतली. त्रिंबकरावांना अतिशय आनंद झाला असला किंवा ते मोठ्या काळजींत असले म्हणजे पानपट्टी खात असत. 'स्कूल फायनल' पास झाले तेव्हां त्यांनीं प्रथम पट्टी खाल्ली. त्यानंतर दुसऱ्यांदा त्यांचें घड्याळ हरवलें तेव्हां एकदां खाल्ली–आणि

मधें एकदां सिनेमाला गेले होते. 'अलीबाबा' चित्रपट पहावयाला, तेव्हां एकदां! पट्टीचा चोथा चघळत चघळत लाल ओंठ करून आनंदी मुद्रेनें दुपारीं सुट्टीनंतर परत येतांना त्रिंबकरावांना पाहून बाकीच्या कारकून मंडळींत खळबळ उडाली. मागें त्रिंबकराव ऑफिसांत नुसता सदरा घालून आले होते त्या वेळीं देखील त्यांना इतकें आश्चर्य वाटलें नव्हतें.

"अरे, काय–आज मांडलं आहेस काय गृहस्था?" असें कोणीं त्रिंबकरावांना विचारण्याचें धाडस केलें. तेव्हां "का, आम्ही जरा चैन करूं नाहीं कीं काय!" असें मान उडवीत त्यांनीं उत्तर दिलें, तेव्हां तर त्यांचे कारकून दोस्त अचंबाच करीत राहिले!

आतां केशवराव काकडे म्हणजे कधीं कोणा कारकूनाशीं बोलावयाचे नाहींत. ते कांहीं हेडक्लार्क नव्हते. पण त्यांचें हपिसांत हेडक्लार्कच्या वर प्रस्थ होतें. सर्व सूत्रें त्यांच्याच हातांत होतीं असें म्हणावयाला हरकत नाहीं. त्यांचा तो करवंदी रंगाचा जरीच्या काड्यांचा रुमाल, ओंठावर पडलेल्या करड्या मिशा, रेशमी कोटाआडून दिसणारें काळें जाकीट व त्यांतून डोकावणारा घड्याळाचा सोन्याचा छडा, बिनकांठाचें स्वच्छ, पायघोळ धोतर व लालभडक जोडा. केशवरावांना सारे कारकून 'साहेब' म्हणून म्हणत, तें कां उगीच? त्या 'साहेबां'नीं स्वतः होऊन त्या दिवशीं त्रिंबकरावांची थट्टा केली. केशवरावांनीं थट्टा करण्यापुरतें देखील एखाद्या कारकुनाकडे लक्ष द्यावयाचें म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. इतर कारकुनांच्या दृष्टीनें तो त्रिंबकरावांचा नोकरींत कायम होण्यापेक्षांही अधिक मान होता; आणि त्रिंबकरावांनाही पण त्याची जाणीव होती. त्या दिवशीं हपिसांतून सुटल्यावर पुन्हां पैशाची पट्टी विकत घेतांना त्यांना इतर कारकुनांनीं पाहिलें तेव्हां तर ते अगदीं हतबुद्धच झाले!

ही झाली परवांची गोष्ट. आज अकरा वाजतां हपिसांत पाय टाकत आहेत तोंच त्रिंबकरावांना केशवरावांनीं एका बाजूला बोलाविलें. पाणी पिण्यासाठीं एका अडगळीच्या कोंपऱ्यांत डेरा ठेवलेला होता, तिकडे ते त्यांना घेऊन गेले. त्रिंबकरावांना वाटलें कीं, बहुतेक आपण कायम झालों असल्याच्या हुकुमाचा कागद केशवराव आपणास दाखविणार; पण केशवरावांनीं त्यांच्या हातांत एक घडी केलेला मळकट कागद दिला व ते हलक्या आवाजांत म्हणाले, "त्रिंबकराव, माझ्याकडे आज ही पत्रिका आलेली आहे एका

मुलीची. आमच्या शेजारीं पाहुणे आले आहेत त्यांची मुलगी. लग्न करण्याचा विचार आहे का तुमचा ? नाहीं म्हणूं नका–हातांतून घालविण्यासारखें स्थळ नाहीं हें ! ”

केशवराव काय बोलत आहेत हेंच त्रिंबकरावांना उमगेना. आज आठ वर्षांत कधीं कोणाच्या लग्नाची नुसती आमंत्रणपत्रिका देखील आपल्याला आली नाहीं तर आज आपल्या स्वतःच्या लग्नासाठीं पत्रिका दाखवायला कोण आणणार ? ते डोळे वासून त्या कुंडलीकडे पाहूं लागले. परवां कायम होणार असल्याची बातमी आणि आज लग्नाचें स्थळ !—आणि तें केशवरावांनीं आणलें ! इकडचा कागद तिकडे न्या असें दरडावून सांगण्यापलीकडे आपल्याशीं कधीं एक शब्द न बोलणाऱ्या केशवरावांनीं आपल्या हातीं कुंडलीचा कागद द्यावा ? लिहिण्यांत चूक झाली तर हात कलम करीन म्हणून धमकी घालणाऱ्या केशवरावांनीं आपल्या दोहोंचे चार हात करण्याची योजना सुचवावी ? अगदींच अजब ! गेल्या आठ वर्षांत कधीं योग आला नव्हता तो एका आठवड्यांत आला ! आपल्या कुंडलींत एकाद्या ‘ लक्ष्मीरोड ’ची योजना सुरू झाली आहे कीं काय, असा त्यांना संशय आला. आपण कायम झालों–आपलें लग्न लागलें व नंतर केशराच्या पाण्यानें शिंतोडलेला रेशमी कोट व करवतीकांठी मळकट धोतर नेसून आपण हपिसांत गेलों, गोविंदा पट्टेवाल्यानें आपणांस जमिनीपर्यंत लवून सलाम केला, नंतर कारकून मंडळी भोंवतीं जमून पाठीवर थापट्या मारीत आहेत, इतकीं सारीं दृश्यें एका निमिषांत त्यांच्या डोळयांपुढून सरकलीं.

“ साहेब, आमची काय थट्टा —” त्रिंबकराव लाजून म्हणाले.

“ त्रिंबकराव, थट्टा नाहीं ही—लग्नाच्या कामांत कसली आली थट्टा ?—आणि पुन्हां गंमत अशी आहे कीं, हें स्थळ फायद्याचें आहे तुमच्या ! म्हणून माझा तुम्हांला एवढा आग्रह आहे ! तुमची स्थिति ही अशी–अजून कायम नाहीं—”

“ पण हुकूम निघाला असें ऐकतों ! ” तेवढयांत त्रिंबकरावांनीं विचारून घेतलें.

“ तें मी नाहीं सांगत—‘ ऑफिशल सीक्रेट ’ आहे तें ! ” केशवराव हंसत म्हणाले.

गोविंदाची बातमी खरी तर ! उगीच केशवराव कां हंसणार आहेत !—

" तेव्हां तुमची स्थिति ही अशी—" केशवराव पुढें म्हणाले; " यांतून उपाय कसा काढावयाचा ? म्हणून मी म्हणतों. कारण, या स्थळांत बरंच डबोलं मिळावयाचा संभव आहे ! " डबोलं नेहमीं डब्यांत असतें अशा समजुतीनेंच कीं काय, केशवराव डब्याच्या आकारासारखे हात करून हलक्या आवाजांत म्हणाले.

' साधेंसुधें स्थळ नव्हे. डबोलेंही आहे त्याच्या पोटांत ! ' डोळे वासून त्रिंबकराव हातांतल्या कुंडलीकडे पाहूं लागले. ग्रहांच्या चौकटीआड त्या डबोल्याचा अस्पष्ट आराखडा देखील त्यांना दिसूं लागला. त्रिंबकरावांच्या सर्वांगावर गोड झिणझिण्या गहिंवरल्या. उकळणाऱ्या गुळाच्या कढईत जसे हजारों बुडबुडे फुटत असतात, तशा गोड व गरम उकळ्या आपल्या नख-शिखांत फुटत असल्याचा त्यांना भास झाला. कपिलाषष्ठींतून आज अमृतयोग निघत आहे, कीं सोन्याच्या खाणींत हिऱ्याचा शोध लागत आहे, कीं मोती-चुराच्या लाडूंत जिलबीचा तुकडा सांपडत आहे, हेंच त्यांना कळेना.

" साहेब, मी का आपल्या बाहेर आहे ?—" त्रिंबकराव मान खालीं घालून अडखळत म्हणाले.

संध्याकाळीं केशवरावांच्या टांग्यांत आणि त्यांच्या शेजारीं बसून जातांना त्रिंबकरावांना पाहून कारकून मंडळींना दुसरा जबरदस्त धक्का बसला. केशव-रावांचे बिऱ्हाडीं गेल्यावर मुलगी पहाण्याचा विधि रीतीप्रमाणें झाला. त्रिंबकरावांनीं तर मानही वर उचलली नाहीं. मुलीला तें काय पाहावयाचें, आणि त्यांतलें आपल्याला कळतें आहे तरी काय ! केशवराव तें सगळें पाहून घेतील अशी त्यांनीं आपली मनाची समजूत करून घेतली होती. तेव्हां मुलगी पसंत होण्याचा प्रश्नच नव्हता मुळीं. पुढल्या बोलण्यासाठीं दोन दिवसांनीं जमूं असें मुलीच्या बापाला केशवरावांनीं सांगितलें. नंतर शिरापुरीवर यथास्थित ताव मारून त्रिंबकरावांची स्वारी डुलत डुलत खोलीकडे परतली.

२

वळकटीला टेकून त्रिंबकराव बराच वेळ पडले होते. केशवराव काकडे हा त्यांच्या विचाराचा विषय होता. आठ वर्षांत हा मनुष्य आपल्याला कळला

नाहीं ! आश्चर्य आहे ! केशवरावांच्या करड्या मिशांचे आड इतका दयाळूपणा दडला असेल अशी त्यांना कल्पना नव्हती ! विलक्षण मनुष्य ! अंतःकरणच त्याचें थोर. नाहींतर काय त्याला पडला होता हा विनाकारण उद्योग ? निष्कारण आपला गैरसमज झाला या माणसासंबंधीं !

इतक्यांत जिन्यावर कोणाचीं तरी पावलें वाजलीं. त्रिंबकराव दचकून पाहूं लागले. एक दहा वर्षांचा मुलगा धडधड धांवत वर आला व खोलीच्या उघड्या दारांतून आंतील अंधारांत डोकावून घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला, " त्रिंबकराव—"

" काय रे बाबू ? " त्रिंबकराव चटकन् उठून बसले.

" त्रिंबकराव, दादा तुम्हांला हांका मारीत आहेत. लवकर चला. आमचा छब्या कसा करतो आहे तो—" बाबू रडक्या सुरांत म्हणाला.

त्रिंबकराव तावडतोब खालीं आले. त्यांच्या खालच्या खोलींत ढेकणे मास्तर रहात होते. खोलींत शिरतात तोंच तोंडाशीं मास्तर सचिंत मुद्रा करून उभे होते. पलीकडे त्यांची बायको दहा—अकरा महिन्यांचा मुलगा मांडीवर घेऊन बसली होती. मधून मधून ती पदरानें डोळे पुशीत होती व मुलाचें अंग चाचपून पहात होती. मुलगा मांडीवर अगदीं निश्चल पडला होता.

" What's the matter मास्तर ? " त्रिंबकरावांनीं घाबरून हलक्या आवाजांत विचारलें.

" त्रिंबकराव, Be quick ! आतांचे आतां एक ब्रॅण्डीची बाटली घेऊन या, वाटेल तें करा; पण या वेळीं ब्रॅण्डी पाहिजे ! छब्याचें Temperature एकदम खालीं उतरत चाललें आहे. आतांच डॉक्टर येऊन गेले त्यांनीं सांगितलें कीं, अंगाला ब्रॅण्डी चोळली पाहिजे सपाटून या वेळीं ! The case is very serious तेव्हां Don't delay ! हे घ्या पांच रुपये—" ढेकणे मास्तरांनीं एक पांच रुपयांची चुरमुडलेली नोट त्रिंबकरावांच्या हातांत खुपसली. डबडबलेल्या डोळ्यांनीं छब्याची आई त्रिंबकरावांच्याकडे पहात होती. तिच्या नजरेला नजर देण्याचें त्यांना धाडसच झालें नाहीं.

" थांबा–मी वरून टोपी घालून येतों—" त्रिंबकराव म्हणाले.

" राहूं द्या हो टोपी ! आहांत तसे जा आतां–Every minute is precious " ढेकणे मास्तर कळवळून म्हणाले.

" बरं–बरं–मी असाच जातों ! आलोंच घेऊन ब्रॅण्डी इतक्यांत !" असें म्हणून त्रिंबकराव झट्कन् घराबाहेर पडले.

घराबाहेर पडले खरे—पण जायचें कोठें ? ब्रॅण्डीची बाटली मिळते कोठें याचा त्रिंबकरावांनीं कोठें विचार केला होता ? प्रेम व ब्रॅण्डी या गोष्टींचा संबंध त्यांच्या आयुष्यांत अद्यापपर्यंत कधीं आला नव्हता. ब्रॅण्डीची बाटली म्हणजे काय महाबळेश्वरी मधाची बाटली आहे, कीं तुळशीबागेच्या कोंपऱ्यावर सहा आण्याचे पैसे टाकले कीं सहज मिळूं शकते ?

डोक्याला टोपी नाहीं, शेंडीचा गुंतावळा वाऱ्यानें उडत आहे, सदऱ्याच्या गुंडया तशाच उघडया, हातांत पांच रुपयांची चुरमडलेली नोट, भयंकर महत्त्वाच्या कामासाठीं निघालों आहोंत या जाणीवेनें बावचळलेली मुद्रा,—अशा स्वरूपांत त्रिंबकरावांची स्वारी रस्त्यांतून झपाझप पावलें टाकीत जातांना पाहून आजूबाजूचे लोक त्यांच्याकडे टंवकारून बघूं लागले. आगीचा बंब बोलवावयास निघालेला मनुष्य देखील इतक्या भेदरट तांतडीनें जातांना दिसत नसेल !

त्रिंबकरावांची कल्पना अशी कीं, ब्रॅण्डीची बाटली म्हणजे सोडालिंबूच्या बाटलीसारखीच असावी. फार झालें तर आंतल्या पाण्याचा रंग तांबडालाल किंवा हिरवागार असावा. कां घासलेटच्या बाटलीसारखी ती असूं शकेल ? छेः, पण बाटली फोडतांना आवाज होत असला पाहिजे, फेंस बाहेर येत असला पाहिजे ! कीं कोण जाणे, पण फट्दिशीं आवाज करून बाटली फोडणें व फेंस फसफस बाहेर येणें या गोष्टींचा व ब्रँडीचा फार बळकट संबंध असला पाहिजे अशी त्रिंबकरावांची कल्पना होती–होती कोठली आतांच एकदम झाली ! त्याचें त्यांनाच आश्चर्य वाटलें कीं, आपल्या डोक्यांत ही गोष्ट एकदम कशी आली ? कारण ब्रॅण्डीविषयीं जन्मांत त्यांनीं कधीं विचार केला नव्हता–आतांच पहिल्याप्रथम ते करीत होते !

वाटेंत ' कोल्ड्रिंक हाऊस ' या अक्षरांची एक लांबलचक पाटी विजेच्या झगझगत्या उजेडांत चमकत होती. त्रिंबकरावांचें एकदम लक्ष्य गेलें तिकडे. थांबलेच ते. इथेंच मिळेल कदाचित् ब्रॅण्डी. त्रिंबकराव सरळ दुकानांत शिरले. दुकानाच्या दोन्ही बाजूंस रंगीबेरंगी पेयांच्या बाटल्या ओळीनें रचून ठेविलेल्या दिसत होत्या. आंत बांकावर आठदहा माणसें कांहींतरी पीत बसलेलीं होतीं.

एका कोपऱ्यात एक पोऱ्या फडक्यांत बर्फ घालून, जोड्याखालीं विंचू सडकून काढावा तशा आविर्भावानें तो ठोकळ्यानें फोडीत उभा होता. एक मध्यम वयाचा इसम–मालकच असावा तो–अंगांत मुंडेछाट गुलाबी कोपरी–गळ्यांत काळा गंडा–गालावर धैर्यधरी दाढी व डोक्याचे केंस तेलानें चपचपलेले असा दाराच्याच तोंडाशीं सिगारेट फुंकीत बसला होता.

त्रिंबकराव आंतमध्यें गेले. इकडे तिकडे त्यांनीं पाहिलें व वाण्याच्या दुकानांत 'ती जिन्नस द्या!' म्हणून आपण सहज हातानें दाखवितों तितक्या सहजतेनें कोंपऱ्यांतल्या रंगीबेरंगी बाटल्यांच्या दिशेनें हात फेंकून ते म्हणाले, "एक ब्रॅण्डीची बाटली द्या हो–जरा लौकर द्या!"

आंत पीत बसलेली मंडळी यमपुरींतल्या बाहुल्यांप्रमाणें एकदम ताठ झाली. बर्फ ठोकणारा पोऱ्या उगारलेला ठोकळा तसाच वरचेवर धरून मारुतीच्या पावित्र्यांत उभा राहिला! विडीचा ओढीत असलेला झुरका तसाच घशांत ठेऊन गुरगुरणाऱ्या बोक्याच्या टरक्या आवाजांत मालकानें वळून विचारलें, "काय पाहिजे रावसाहेब तुम्हांला?"

"कांहीं नाहीं; एक ब्रॅण्डीची बाटली पाहिजे!" त्रिंबकराव 'दोन पैशांचा बर्फ पाहिजे' या सुरावर शांतपणें म्हणाले. "जरा भारीपैकीं द्या हं—"

गिऱ्हाईक मंडळींत हंशाचा बॉंबगोळा फुटला! एका गिऱ्हाइकाचें दह्याचें आइस्क्रीम त्याच्या धोतरावर सपशेल सांडलें! तर एकाला हंसण्याचीं उबळ आवरतां न आल्यामुळें एवढा मोठा ठसका बसला, कीं त्याच्या घशांतील 'जिंजर'चे फवारे 'मायर्स' पंपमधून निघणाऱ्या पाण्याच्या वेगानें त्याच्या-समोर बसलेल्या दोन गिऱ्हाइकांच्या नाकातोंडांत शिरले! बर्फ फोडणाऱ्या पोऱ्याचा उजव्या हातांतला ठोकळा त्याच्या डाव्या हातावर इतक्या जोरानें आदळला, कीं तांग्यांखालीं शेंपूट सांपडलेल्या कुत्र्याप्रमाणें तो एकदम किंचाळून हात झाडूं लागला.

"ब्रँडीची बाटली!" मालक घटोत्कचाच्या पाटर्याप्रमाणें ओरडून म्हणाला, "का उस्कीची बाटली पाहिजे?"

भोंवतालची मंडळी पोट धरूनधरून कां हंसत आहेत–कोंपऱ्यांतला पोऱ्या घारीसारखा कां किंचाळतो आहे—मालक गांजेकसाचा अभिनय करून कां डुरकाळ्या फोडतो आहे हें त्रिंबकरावांना कळेना. मुंबईच्या रस्त्यावर

गाड्यांच्या कर्कश गोंधळांत सांपडलेल्या खेडवळाच्या अजागळ मुद्रेनें ते बघूं लागले.

" काय ? पहातां काय असं ? बोलाना ! ब्रॅण्डी पाहिजे का उस्की पाहिजे ?" मालक खंवचटपणानें ओरडला.

" नाहीं ब्रॅण्डीच पाहिजे ! " त्रिंबकराव भीत भीत म्हणाले. मालकाच्या प्रश्नांतली खोंच त्यांच्या डोक्यांत कोठली यावयाला ? पुन्हां गिऱ्हाइकांमध्यें हंसण्याचा कल्लोळ उडाला ! यावेळीं ज्या गिऱ्हाइकाच्या नाकातोंडांत मघाशीं जिंजरची उष्टावण शिरली होती, त्यानें ' टॉनिक 'चा कडवट गुळणा समोरच्या ' जिंजर ' वाल्यावर फेंकून मघांच्या अपमानांची भरपाई केली !

आपण एकाद्या वेड्याच्या इस्पितळांत तर शिरलों नाहीं ना, अशी त्रिंबकरावांना भीति वाटली ! का आपल्याच वेड लागलें आहे—किंवा आपण स्वप्नांत आहोंत—काय झालें आहे तरी काय, हेंच त्यांना कळेना. विजेच्या दिव्यांनीं दिपल्यामुळें आधींच किलकिले झालेले डोळे चोळीत ते आजूबाजूला पाहूं लागले.

" अरे, डोळे काय चोळतो आहेस ? " मालकानें एकेरीवरच बोलण्यास सुरवात केली, " कां चढली आहे लई ? ब्रॅण्डीची बाटली पाहिजे आहे लेकाला ! बेवडा बरा नाहीं मागितलास ! हें काय कलालाचें दुकान आहे काय ? उतर खालीं ! आठ नाहीं वाजले तर इतका प्याला—मग बारा वाजतां काय होईल अगदीं मुडदा ! "

मालकाच्या या मुडदेफरास कोटीला खांदा द्यावयाला आंतील गिऱ्हाईक मंडळी तयार होतीच. त्यांच्या पोटांत अगदीं गुदगुल्या झाल्या. दुकानाचा मालक काय बडबडतो आहे याचा त्रिंबकरावांना बोध झाला नाहीं. ते इतके भ्याले कीं, काय बोलावें हेंच त्यांना कळेना. त्यांची दांतखिळीच बसली. आठ दिवसांची गालावर वाढलेली दाढी खाजवीत खाजवीत ते मागें परतले. जातांना पुन्हां अडखळत त्यांनीं मालकाला एकवार विचारण्याचा धीर केलाच—" मग नाहीं तुमच्या इथें ब्रॅण्डी ? "

" अरे-जा बेट्या ! नाहींतर ब्रँडीच्या ऐवजीं गचांडी मिळेल ! " मालक दांत खाऊन हातवारे करीत म्हणाला, " चांगल्या दुकानांत येऊन ब्रॅण्डी मागायला लाज वाटत नाहीं ! अन् मिजास तरी बघा ! चार आण्याचा

अंगांत कोट नाहीं आणि प्यायला ब्रॅण्डी पाहिजे! गणप्या—" बर्फफोड्या नोकराकडे वळून मालक म्हणाला, " दे हाकून याला—तुझा ठोकळा घाल त्याच्या टकोरींत म्हणजे येईल जरा शुद्धीवर—"

गणप्या आपला लाकडी हातोडा परजीत येण्याचे पूर्वींच त्रिंबकराव रस्त्यावर पसार झाले होते. इतकी चपळता त्यांनीं जन्मांत कधीं दाखविली नसेल!

" काय घाण सुटली आहे?" त्रिंबकराव गेल्यावर एक गिऱ्हाईक नाकपुड्या फेंदारून व तोंडांत पंचगव्य गेल्यासारखा चेहरा करून म्हणाले. त्याबरोबर बाकीच्या गिऱ्हाइकांना एकदम घाण आली व जो तो नाकपुड्या हलवून प्राणायामाचा प्रयोग करूं लागला.

" अंगानें आहे फाटका—पण पट्टीचा पिणारा आहे! अरे, मी काय याला आज पहातों आहें? तो दुकानांत शिरल्यावरच मीं त्याला ओळखलें!" दुसरें एक गिऱ्हाइक गेंगाण्या आवाजांत म्हणालें.

" लइ प्याली व्हती स्वारी! बोलतां बी येत नव्हतं नीट! अन् डोक्यावर टोपी बी नव्हती त्याच्या–पाह्यलं कां तुम्हीं?" ' हाफ सोडा ' पीत बसलेले एक ' गनपतराव ' बोलले.

" पडली असेल गटारांत! दारूंत काय शुद्ध रहायची आहे?" उंसाच्या गुऱ्हाळांत बसल्याप्रमाणें एक गिऱ्हाईक दूध—कोल्ड्रिंक पीत होतें तें म्हणालें.

" मद्यप्राशनानें एवढा स्मृतिभ्रंश व्हायचाच!" मोरावळ्याप्रमाणें एक शास्त्रीबुवा आइस्क्रीम बोटानें चाटून खात बसले होते ते बोटें चोखीत उद्गारले.

" अरे, आज तर कांहीं नाहीं!" गेंगाण्या आवाजाचा गृहस्थ पुन्हां म्हणाला, " परवा तर ही स्वारी रस्त्यावर दिगंबर होऊन पडली होती!"

फिरून एकवार दुकानांत हंशा उसळला.

आपणाला काय अजब माहिती आहे अशा आत्मविश्वासानें गेंगाणा गृहस्थ सभोंवार ऐटीनें पहात पुढें म्हणाला,—" अन् मीं त्याला माझें उपरणें नेसवून घरीं पोहोंचविला—शनीच्या पाराच्या कोंपऱ्यावर रहातो हा! फार दिवसांपासून मी ओळखतों याला!—"

त्रिंबकरावांच्या ' दारुबाजी ' बद्दल अचंबा करीत व गेंगाण्या गृहस्थाच्या अपूर्व कामगिरीचें कौतुक करीत गिऱ्हाइकें हळुहळू उठूं लागलीं.

दुकानांतून बाहेर पडतांना त्रिंबकराव इतके संतापलेले होते कीं, सांगतां सोय नाहीं. कोल्ड्रिंक हाऊसमधून इतका गरम झालेला गृहस्थ कधींच बाहेर पडला नसेल. त्यांना त्या दुकानाच्या मालकाचा व तेथल्या गिऱ्हाइकांचा इतका राग आला होता कीं, सोडावॉटरच्या बाटल्यांनीं त्याचीं टाळकीं शेकून काढावींत असें त्यांना वाटलें.

इतका अपमान व कुचेष्टा सहन करून ब्रॅण्डीची बाटली आणण्यापेक्षां तसेंच घरीं परत गेलेलें काय वाईट ? मरेना ढेकणे मास्तरांचें कारटें—!

त्रिंबकरावांनीं एकदम जीभ चावली. भलतेंच काय आपण बोललों ? ढेकणे मास्तरांचा कळवळलेला चेहरा त्यांना आठवला, छब्याच्या आईची केविलवाणी मुद्रा त्यांच्या डोळ्यासमोर उभी राहिली ! छेः !—कांहीं झालें तरी ब्रॅण्डीची बाटली नेलीच पाहिजे ! त्रिंबकराव झपाझप चालूं लागले.

पण जायचें कोठें ? आणि ब्रॅण्डीची बाटली मिळणार कशी ? हें किराण्याचें दुकान—तें मिठाईचें – तें चिवडेवाल्याचें—तें कापडाचें—रस्त्याच्या दोहों बाजूचीं दुकानें पहात पहात ते झपाट्यानें पुढें चालले होते. पण ' येथें ब्रॅण्डी मिळेल ' अशी पाटी असलेलें एकही दुकान दिसेल तर शपथ ! असा राग आला त्यांना साऱ्या दुकानदारांचा ! चांगल्या बाजारपेठेंत एकादें देखील ब्रॅण्डीचें दुकान असूं नये ? किती नामुष्कीची गोष्ट आहे !

इतक्यांत इराण्याचें दुकान दिसलें त्यांना. कदाचित् या दुकानांत मिळत असेल ब्रॅण्डी ! हिंदु दुकानदारासारखे ते भ्यायचे नाहींत ब्रॅण्डी विक्रीस ठेवावयाला ! अन् मांसमच्छर येऊन खाणार यांच्या दुकानांत लोक. यांच्याकडे ब्रॅण्डी जरूर सांपडावयाची ! ख्रिस्ती–इराणी वगैरे लोक मांसाचे तुकडे ब्रॅण्डींत बुचकळून खात असावेत अशी त्रिंबकरावांची कल्पना होती.

त्रिंबकरावांनीं एकवार आजुबाजूला पाहिलें. आपणाकडे कोणी पहात नाहीं अशी त्यांनीं खात्री करून घेतली व झटकन ते इराण्याच्या दुकानांत शिरले.

आंत गेल्यावर उजव्या बाजूला एका टेबलाच्या आड खुर्चीवर एक भलाभक्कम लालबुंद इराणी डोक्याला लहानशी चटईची टोपी अडकवून बसला होता.

इराण्याशीं कसें बोलावें हें त्रिंबकरावांना ठाऊक नसल्यामुळें ते जरा गोंधळले. पण शेवटीं मनाचा हिय्या करून ते म्हणाले, " खानसाहेब,

आपके पार्शो ब्रॅण्डीची बाटली है ? " ' खानसाहेब ' जर खरोखरच मुसलमान असते तर आपल्या भाषेशीं त्रिंबकरावांनीं केलेला व्यभिचार पाहून त्यांनीं त्यांचा ' खिमा 'च केला असता; पण ते पडले इराणी !

जागेवरून न हलतां अर्धवट डोळे उघडून ते हंसत म्हणाले, " ब्रॅण्डीच्या बाटली ? "

" हो—हो ! ब्रॅण्डीची बाटली ! " त्रिंबकराव मान हलवीत स्मित करून म्हणाले. आतां या इराण्याजवळ आपलें काम खास होणार असें त्यांना वाटलें.

" ते पिवायची ब्रॅण्डी ? " इराण्यानें पुन्हां गंभीरपणानें विचारलें.

" हो—हो, तीच ती ! " त्रिंबकरावांनीं मान हलवली. कोणास ठाऊक प्यायची कां चाटायची ? का अंगाला लावायची ?

" तुमी पिते ती ? " इराण्यानें मिस्कीलपणानें विचारलें.

त्रिंबकराव तोंड वेडेंवांकडें करून हंसले व नकारार्थी मान हलवून ते म्हणाले, " नाहीं, आम्हांला घरीं पाहिजे—"

" घेरी न्यायला नाय मिलेल ! तुमी हिते पेल, तो आमी देल तुमाला एक गलासभर ! " इराणी चावटपणानें हंसून म्हणाला.

" असें करूं नका साहेब ! आमची फार नड आहे घरीं ! मेहेरबानी करा—द्या एक बाटली ! " त्रिंबकराव गयावया करून म्हणाले.

" आज काय पार्टी हाय घेरी ? अन् एक बाटली कशी पुरेल ! " इराण्याला त्रिंबकरावांची कींव आली नाहीं. पलीकडे गिऱ्हाइकांना चहा देत असलेल्या दुसऱ्या एका उंचेल्या इराण्याला उद्देशून तो हंसत म्हणाला, " ए गुस्तास्प, आय जो, आ बेवकूफने ब्रॅण्डी जोइए ! छे के तारी पासे ? होय तो आपो एमने ! "

चहाच्या कपांचा ताबूद हातावर पेलून गुस्तास्प खड्या पारश्यासारखा उभा राहिला व त्रिंबकरावांकडे आ वासून पाहूं लागला. चहाच्या दुकानांत ब्रॅण्डी मागावयास आलेलें गिऱ्हाईक त्यानें कधीं पाहिलें नव्हतें. त्रिंबकरावांचा अवतार पाहून त्याला इतकें हंसूं कोसळलें कीं, त्याच्या हातांतील कपांची चवड पिसा येथील मनोऱ्याप्रमाणें एका बाजूला कोलमडून खालीं पडली. एक क्षणभर दुकानांत चांगला गोंधळ उडाला.

नेहमीच्याच परिचयाचें दृश्य म्हणूनच कीं काय कपबशांच्या उधळलेल्य ा

अस्थि गोळा करीत बसलेल्या गुस्तास्पकडे दुर्लक्ष्य करून इराणी त्रिंबकरावांना सलाम करीत म्हणाला, " रावसाब, ज्या घेरी ज्या, मेहेरबानगी करा ज्या ! आतां लई पिऊ नका ! लई पिएल तो मरेल गटारामंदी पडूनशानी ! ब्रॅण्डी तो लई इस्ट्रांग न्हाते–तुमाला नाय पचायची ! ते करता ताडी पिएल तो जरा नगडा व्हएल–ज्या !"

बापाच्या भुताकडे पाहणाऱ्या हॅम्लेटच्या चेहऱ्यानें व पावलानीं त्रिंबकराव दुकानाबाहेर पडले. इराणी म्हणजे कोल्ड्रिंकवाल्याचाच भाऊ दिसतो आहे ! दुकानदार म्हटले म्हणजे सारे बदमाष–मग हिंदु असो अगर इराणी असो ! रस्त्यावर आल्यावर पुन्हा तोच प्रश्न ! छे, आज ब्रॅण्डी कांहीं मिळत नाहीं आणि ढेकणे मास्तरांचें पोरगें कांहीं जगत नाहीं ! साडेआठ वाजून गेले असतील आतां ! बहुतेक तें गार पडलें असेल. तेवढ्यांत त्रिंबकरावांनीं चुकून आपलें अंग चांचपून पाहिलें !

इतक्यांत एकदम त्यांना कसलीशी आठवण झाली. क्षणभर ते थबकले. स्वतःशींच हंसून त्यांनीं चुटकी वाजविली ! बरोबर-दारूवाल्याचा पूल–दारूवाल्याच्याच पुलावर दारू मिळत असणार ! काय गाढव आहें मी ! आतांपर्यंत माझ्या कसें ध्यानांत आलें नाहीं हें ? पण दारूवाल्याच्या पुलावर जाऊन परत येईपर्यंत किती तरी वेळ लागावयाचा !

जवळून एक रिकामा तांगा चालला होता. त्याला थांबवून त्रिंबकराव आंत बसले. " दारूवाल्याचा पूल–हाण लौकर ! " त्रिंबकराव ओरडून म्हणाले. टांगा भरधांव निघाला. पांच दहा मिनिटांच्या आंतच टांगा त्या पुला-जवळ आला.

" पुलावर कुठं थांबायचं रावसाहेब ?" मागें न पहातांच तांगेवाल्यानें विचारलें.

" कुठंही एकाद्या दारूच्या दुकानापाशीं उभा कर म्हणजे झालं !" त्रिंबकराव एकाद्या माहितगाराच्या बेपर्वाईनें बोलले. त्याची कल्पना होती कीं, दारूवाल्याच्या पुलावर दारूचीं दुकानें दोन्ही बाजूला थाप लागून गहिलीं असावींत.

तांगा उभा राहिला. त्रिंबकराव बाहेर डोकावून पाहूं लागले; पण त्यांच्या अपेक्षेप्रमाणें दारूचें दुकान कोठेंच त्यांना दिसेना ! एक लहानसें दुकान

दिसत होतें खरें; पण आंत फारसा उजेड दिसत नव्हता. फक्त एक दिवा मिणमिणत होता. एका कोपऱ्यांत ' चंद्रज्योती'च्या पणत्या व भुइनळे सांठविलेले दिसत होते. बाहेर फळीवर एक लठ्ठ मुसलमान कानावर लोंकरी गळपट्टा लपेटून स्वस्थ बसला होता. आणि रस्त्याच्या भिंतीला टेंकून आतषबाजीच्या जळक्या ' झाडां'चे दोन चार बांबू उभे केलेले होते.

" हें कुठलें. दुकान ? आंत बाटल्याबिटल्या दिसत नाहीं त्या—" त्रिंबकराव तांगेवाल्यास उद्देशून निराशेनें म्हणाले.

" हां–हां, त्यें दारूचं दुकान व्हय ?" एकदम डोक्यांत उजेड पडल्यासारखा तांगेवाला ओरडला, " असं म्हणा कीं ! प्यायची दारू पाहिजे व्हय ? मला वाटलं उडवायची दारू !"

प्यायची दारू काय आणि उडवायची दारू काय ? त्रिंबकरावांना कांहींच कळेना. उडवायची दारू पाण्यांत कालवूनच प्यायची दारू बनवीत असावेत अशीच त्रिंबकरावांची फार लहानपणापासून कल्पना होती. तथापि तांगेवाला माहितगार दिसतो आहे असें वाटून त्यांनीं त्याला विचारलें. " मग तें दुकान कुठें असतें ?"

त्यें तिकडं गणेश पेठेंत पिंवळ्या नाक्याजवळ !—नाहींतर खडकावर जावं लागेल !" तांगेवाला मेनकेला झिडकारणाऱ्या विश्वामित्राप्रमाणें हात उंचावून म्हणाला.

" खडकावर नको. गणेश पेठेंतच चल !" त्रिंबकराव म्हणाले. जसें काय कुठलें ठिकाण अधिक जवळ हें त्यांना नक्की ठाऊकच होतें.

तांगेवाल्यानें तांगा पिटाळला. काय किंमतीचें कूळ आपल्या तांग्यांत बसलें आहे हें त्यानें चटकन् ओळखलें. बऱ्याच अंधाऱ्या बोळांतून वेडींवांकडीं वळणें घेत अखेर तांगा मोठ्या रस्त्यावर आला. बोगद्यांतून आगगाडी जात असतां गच्च डोळे मिटून बसणाऱ्या पोराप्रमाणें त्रिंबकराव तांग्याच्या पाठीमागल्या कातडी पट्ट्याला धरून गपचिप बसले होते. एक ब्रॅण्डीची बाटली विकत घ्यावयाला इतका त्रास तर रोज ब्रॅण्डीच्या बाटल्यांशीं व्यवहार करणाऱ्या साहेब लोकांना जिवाचा किती आटापीटा करावा लागत असेल या त्रैराशिकाचें उत्तर शोधून काढण्यांत त्यांचें डोकें गर्क झालें होतें.

" ह्यो आला पघा गुत्ता साहेब !" टांगेवाला एकदम टांगा थांबवून

ओरडला. त्रिंबकराव एकदम दचकून शुद्धीवर आले. बाहेर वांकून पाहातात तों कांहींच दिसेना त्यांना! एक दुकान दिसत होतें, पण त्याच्या फळ्या लावलेल्या होत्या. बाहेरच्या बाजूला एक भजीवाला घासलेटच्या धुराड्या दिव्याच्या प्रकाशांत बसलेला दिसत होता. पण तोही आपलें बस्तान आंवरण्याच्याच बेतांत होता.

"बंद झालें वाटतें दुकान?" त्रिंबकरावांनीं घाबरून विचारलें.

"हां, आतां साडे आठ वाजून गेले! आतां गुत्ता कुठला उघडा राह्यला?" तांगेवाला अगदीं शांतपणें म्हणाला. सुतक काय आणि सोयर काय, त्याला दोन्ही सारखींच! दारूवाल्याच्या पुलावरून निघतांनाच त्याला ठाऊक होतें कीं, गणेश पेठेंत जाईपर्यंत गुत्ता उघडा राहणें शक्य नाहीं! पण तसें त्यानें त्रिंबकरावांना सांगितलें असतें तर तो तांगेवाला कसचा!

"मग आतां!" त्रिंबकराव हताश होऊन उद्गारले. त्यांच्या तोंडाला आतां कोरड पडली व डोळ्यापुढें काजवे चमकूं लागले. छे:! ढेकणे मास्तराचें पोर आज जगणें शक्य नाहीं! त्याच्या अष्टमस्थानांत आज राहु-केतु-शनी वगैरे पाजी ग्रहांनीं मैफलच मांडलेली दिसते असा त्यांनीं कयास बांधला.

"काय तांगेवाले, काय भजीं. कवटीं, कबाब कांहीं पाहिजे?" जातां जातां चार-दोन पैशांचा माल खपला तर पहावा. या आशेनें भजीवाल्यानें विचारलें.

"दुकान बंद झालें न् खायला काय करायचंय राव? लांबून गिऱ्हाईक आनलं व्हतं! अन् इथं येतों तों दुकान बंद! लई नड व्हती—पण आतां काय—?" तांगेवाल्यानें उत्तर दिलें.

"मग काय झालें? मागून जा ना त्या बाजूनं! इकडून बंद झालं पण तिकडून उघडं आहे ना? वा, तांगेवाले, तुम्हीं माहितगार अन् असें काय करतां नवख्यासारखं?" भजीवाल्यानें 'टिप' दिली. तांगेवाला भजीवाल्यावर मनांत खूप संतापला. तो बोलला नसता तर त्रिंबकरावांना 'खडका' ची सफर करून आणण्याचा त्याचा बेत होता.

त्रिंबकराव टांग्यांतून चट्‌कन् उतरले व भजीवाल्यानें दाखविलेल्या बाजूकडे ते गेले. तिकडे एक लहानसें दार अर्धवट उघडें होतें. त्रिंबकराव हलकेच

आंत डोकावून पाहूं लागले. पहिल्या प्रथमच आंतून घाणीचा इतका उग्र भपकारा आला कीं, केशवरावांच्या घरीं झोडलेली शिरापुरी एकदम त्यांच्या घशांत उसळून वर आली. धोतराच्या सोग्यानें त्यांनीं नाक दाबून आवंढा गिळला. ब्रॅण्डीची बाटली मिळवितांना काय काय आपदा येतात कोणास ठाऊक ? आंत मुळींच गर्दी नव्हती. एका कोपऱ्यांत दोनतीन इसम कांचेच्या हंडयांमध्यें ठेवतात तसल्या ग्लासातून कांहींतरी पीत बसले होते. एका बाजूला एका ओट्यावर तोट्या असलेलीं दोन चार लठ्ठ पिंपें ठेविलेलीं दिसत होतीं. त्यांचा स्वच्छ पांढरा रंग व दोन्हीं कडांना रंगविलेले तांबडे पट्टे गॅसच्या झगझगीत उजेडांत चमकत होते. दत्ताचें नांव घेऊन त्रिंबकरावांनीं आंत पाऊल टाकलें. त्यांचा एक हात जानव्याच्या गांठीवर होता.

" बसा बांकावर तिकडे ! " त्रिंबकरावांना पाहून एक पोऱ्या म्हणाला.

" बसायचं नाहीं, मला एक ब्रॅण्डीची बाटली पाहिजे ! लौकर द्या ! " बाटली मिळण्यापेक्षां त्या दुकानांतून बाहेर पडण्याची त्रिंबकरावांना अधिक घाई होती.

" ब्रॅण्डीची बाटली ! " एका हातांत फुटाण्याची बशी व दुसऱ्या हातांत अर्धवट भरलेला ग्लास घेऊन पोऱ्या चालला होता तो एकदम थबकला. " हें देशी दारूचं दुकान आहे ! विलायती दारू इथं औषधाला देखील मिळायची नाहीं ! "

' विलायती दारू ' हे शब्द त्या पोऱ्यानें अगदीं तुच्छतेनें उच्चारले, देशी दारूचा पक्का अभिमानी दिसला तो ?

मागें असलेल्या बांकावर त्रिंबकराव मट्कन् बसले व कपाळाला हात लावून घोगऱ्या आवाजांत उद्गारले, " मग ! "

" मग काय ? रम् पाहिजे असेल तर मिळेल. ती चांगली कडक असते !" पोऱ्यानें आपलें ' अधिकृत मत ' दिलें.

" हा हा, रम् तर फार कडक–म्हंजे–फारच कडक ! ही काय मी पितों आहे ! " कोपऱ्यांत बसलेल्या इसमांपैकीं एकजण तारवटलेल्या सुरांत बडबडत आपल्या हातांतील ग्लास त्रिंबकरावांकडे वळून दाखवूं लागला.

त्रिंबकराव त्या इसमाकडे पाहूं लागले आणि एकदम दचकून उभे राहिले.

त्याही इसमाच्या हातांतला ग्लास गळून पडला. तो ताड्कन् उठला. त्याची धुंदी थोडी उतरल्यासारखी झाली.

कोण ? गोविंदा पट्टेवाला ! आपल्या हपीसांतला गोविंदा पट्टेवाला ! आणि तो इथें कसा ! आपल्याला अशा वेषांत इथें पाहून त्याला काय वाटेल याचा विचार करण्यापेक्षां तो तेथें कसा याचेंच त्रिंबकरावांना आश्चर्य वाटून ते त्याच्याकडे बघूं लागले. गोविंदा अर्धवट शुद्धीवर होता, तरी त्यानें त्रिंबकरावांना ताबडतोब ओळखलें. ते गुत्त्यांत कसे याबद्दल आश्चर्य वाटण्याऐवजीं किंवा त्यांनीं आपल्याला पितांना पकडलें म्हणून लाज वाटण्याऐवजीं, ते आपल्याच पंथांतले आहेत या अपूर्व शोधाच्या आनंदानें गोविंदाच्या पोटांत हर्षाच्या गुदगुल्या उठल्या. आपली निम्मी रम् त्रिंबकरावांनीं वायां घालवली याचें त्याला आतां कांहींच वाईट वाटलें नाहीं. एकूण हा बामण बराच वस्ताद दिसतो आहे ! आजपर्यंत कधीं पत्ता लागूं दिला नाहीं. गोविंदा त्रिंबकरावांकडे धडपडत गेला. त्रिंबकराव मागें सरकले म्हणून बरें, नाहींतर गोविंदानें त्यांच्या गळ्याला मिठीच मारली असती.

" वा ! त्रिंबकराव, खूप केलीत आज ! आम्हांला अगदीं चीत मारलेंत ! खूष झालोंत आपण आज ! अन् आजपत्तर याचा पत्ता बी आम्हांला लावून दिला नाहींत ! आतां अच्छेर बेवडा आम्हांला पाजल्याखेरीज आपण नाहीं तुम्हांला जाऊं देणार ! हो-अच्छेर तरी पाहिजेच ! तुम्ही आतां कायम होणार-अन आम्हांला एवढं बी नाहीं म्हणजे काय-! " गोविंदा दोस्ताच्या मोकळेपणानें बरळूं लागला.

गोविंदाच्या बडबडण्याकडे त्रिंबकरावांचें लक्ष नव्हतें. त्यांच्या डोक्यांत फक्त ढेकणे मास्तरांचें पोर आणि ब्रॅण्डीची बाटली एवढ्या दोनच गोष्टी होत्या. कदाचित् आपल्याला या अडचणींत गोविंदाचा उपयोग होईल !

" गोविंदा ! " त्याचा हात धरून त्रिंबकराव म्हणाले, " माझें काम करशील तर वाटेल तें देईन तुला ! आपल्याला एक ब्रॅण्डीची बाटली पाहिजे या वेळीं ! काय वाटेल तें कर, पण एवढें काम झालें पाहिजे. नाहीं म्हणूं नकोस—एक जीव वांचविल्याचें श्रेय तुला मिळेल बघ ! "

ब्रॅण्डीच्या बाटलीमुळें कोणाचा जीव वांचणार आहे हें त्रिंबकरावांच्या चेहऱ्याकडे पहातांच गोविंदाच्या चट्कन लक्ष्यांत आलें ! त्रिंबकरावांचें

प्रकरण भारींतलें आहे–आपल्यासारखे ते अगदींच बेवड्याचे भगत नाहींत हें ध्यानांत येतांच गोविंदाला त्यांच्यासंबंधीं आदर वाटूं लागला. सलूनवाल्या-संबंधीं खुंटावरच्या न्हाव्याला किंवा एम्. बी. बी. एस्. डॉक्टरविषयीं एखाद्या ' हॉस्पिटल असिस्टंट ' ला वाटत नसेल, बॅरिस्टराला पाहून एखाद्या मुखत्यार वकीलाला किंवा जी. आय. पी. रेल्वेच्या गार्डाला पाहून बार्शी लाइट रेल्वेच्या मालगाडीवरच्या गार्डाला वाटत नसेल इतका आदर–इतकें कौतुक गोविंदाला त्रिंबकरावासंबंधीं वाटूं लागलें. हपिसांतच नव्हे तर ' पिण्यांत ' देखील बामणांचा दर्जा आपल्यापेक्षां जास्त असतो, हें त्याला कळून आल्यानें तो चांगलाच नरम आला.

" ब्रॅण्डीची बाटली आतां कुठं मिळणार साहेब ? " गोविंदा डोकें खाजवीत विचार करूं लागला. त्रिंबकराव त्याच्या तोंडाकडे आशेनें पाहूं लागले. ढेकणे मास्तरांच्या पोराचें जीवित—जर तें आतांपर्यंत शिल्लक असेल तर—गोविंदाच्या पुढील उत्तरावर अवलंबून आहे याची त्यांना खात्री वाटली.

गोविंदाला एकदम कांहींतरी आठवलें. त्याचें तोंड एकदम निवळलें. तो हंसून म्हणाला, " झालें तुमचें काम साहेब ! आतां स्टेशनावर पण जायला नको ! नक्की सांगतों तुम्हांला ब्रॅण्डी कुठें मिळेल तें !—थोडा त्रास आहे मात्र ! पण ब्रॅण्डीवाचून चालायचंच नाहीं का अगदीं ?—"

" छे:, छे: ! प्राण गेला तरी हरकत नाहीं, ब्रॅण्डी पाहिजे या वेळीं—" त्रिंबकराव एकदम थांबले. फारच वीरश्रीनें आपण बोललों याची त्यांना जरा लाज वाटली. ' प्राणाची ' भाषा त्यांनीं आजपर्यंत कधीं केली नव्हती.

त्रिंबकरावांच्या अपूर्व ब्रॅण्डी–भक्तीचें गोविंदाला क्षणमात्र कौतुक वाटलें. त्याच्या डोळयांत आनंदाश्रु उभे राहिले. एकेचाळीस रुपये पगारावर एवढी जबरदस्त तपश्चर्या करणारा महात्मा त्यानें आजपर्यंत पाहिला नव्हता.

" सांगू ? आपल्या केशवरावसाहेबांकडे मिळेल ब्रॅण्डी ! "

" कोण–केशवराव ? " त्रिंबकरावांनीं विचारलें.

" आपले काकडेसाहेब ! "

" कोण ? आपले केशवराव काकडे ? काय म्हणतोस ? " त्रिंबकरावांना भयंकर आश्चर्य वाटलें. पण ते केशवरावांकडे ब्रॅण्डी आहे ही बातमी कळल्या-

मुळें नसून, ही गोष्ट आपल्याला आतांपर्यंत ठाऊक कशी नव्हती, याबद्दल होतें.

"हो–हो! केशवरावसाहेब आपले!–त्यांच्याकडे रगड सांठा असतो सगळा! ते म्हणजे यांतले दर्दी!" त्रिंबकराव आतां आपल्यांतलेच; तेव्हां केशवरावांचें रहस्य त्यांना सांगायला कांहीं हरकत नाहीं असें वाटून गोविंदा म्हणाला.

"मिळेल त्यांच्याकडे ब्रॅण्डी?" त्रिंबकरावांना अजून खरें वाटेना!

"मिळेल म्हणजे? मीच आणून देतों ना त्यांना समदें तें! एक वेळ या गुत्त्यांत बेवडा मिळायचा नाहीं, पण केशवरावांच्या कपाटांत कधीं मोकळी बाटली सांपडायची नाहीं! उगाच नाहींत काकडेसाहेब!" गोविंदा मोठ्या अभिमानानें बोलत असावासा वाटला.

"शाबास! मग मी जातों तर आतां—" त्रिंबकराव दाराकडे वळले.

"मी येतों ना आपल्याबरोबर पाहिजे तर!" त्रिंबकरावांच्या बाटलींत आपलाही कांहीं लग्गा लागला तर पहावा या धोरणानें गोविंदा म्हणाला.

"वाः! मग ठीक! मलाही सोबत होईल! चल!" त्रिंबकराव म्हणाले. गोविंदा आतां बराच शुद्धीवर आला होता. पोऱ्याच्या हातावर त्यानें कडोसरीचे पैसे टाकले व तो त्रिंबकरावांच्या मागोमाग बाहेर पडला. तांगा बाहेर उभा होताच.

"काय साहेब, मिळालं ना सगळं?" स्वतःच्या घरीं जेवलेल्या भिक्षुकांचा समाचार घेणाऱ्या यजमानाच्या औदार्यानें तांगेवाल्यानें विचारलें. त्याला उत्तर न देतां त्रिंबकराव तांग्यांत बसले. गोविंदा पुढच्या बाजूस तांगेवाल्याशेजारीं बसला.

"चला मंडईच्या मार्गें जलदी!" त्रिंबकरावांनीं फर्माविलें. तांगा चालूं लागला,

इतक्या रात्रीं केशवरावांच्या घरीं जाऊन त्यांना जागें केलें तर त्यांना राग तर येणार नाहीं! पण छे, आतां तें शक्यच नाहीं. केशवरावांचें व आपलें आतां नातेंच निराळें झालें. आज संध्याकाळींच आपण त्यांच्या घरून शिरापुरी खाऊन आलों. दोन दिवसानीं पुन्हां आपलें लग्न ठरवायला त्यांच्याकडे जावयाचें आहे, आतां केशवराव आपल्या घरोब्यांतलेच म्हणावयाला

हरकत नाहीं ! आणि शिवाय आजारी माणसाच्या कामासाठीं आपण आलों, असें सांगितलें म्हणजे प्रश्नच नाहीं ! असल्या कामीं अनोळखी मनुष्य देखील 'नाहीं' म्हणावयाचा नाहीं तर केशवरावांची गोष्टच नको ! बाकी केशवराव म्हणजे अजब गृहस्थ—काय काय चिजा त्याच्याजवळ सांपडतील ! केशवरावांचें मनांतल्या मनांत कौतुक करण्यांत तिकडे ढेकणेमास्तराच्या पोराची काय अवस्था झाली असेल, त्याची कांहीं काळ त्रिंबकरावांना विस्मृतीच पडली. इकडे गोविंदाच्या डोक्यांत निराळेच विचार चालले होते. आज आपल्याला चांगलाच जल्लोष करायला मिळणार या विचाराच्या धुंदीनें तो अगदीं गुंगून गेला होता.

दहापंधरा मिनिटांतच केशवरावांच्या घरापुढें येऊन तांगा थांबला. तसे त्रिंबकराव खालीं उतरले. गोविंदा तांग्यातच बसून राहिला. दाराची कडी वाजवावी का केशवरावांना हांक मारावी याबद्दल त्रिंबकराव क्षणभर बुचकळयात पडले. सरते शेवटीं त्यांनीं कडीच वाजविण्यास सुरुवात केली. पण आंतून कोणीच उठल्याची चाहूल लागेना. तेव्हां त्यांनीं मोठ्यानें हाका मारावयास आरंभ केला.

समोरच्या घराच्या जोत्यावर कोणीतरी इसम पांघरूण डोक्यावर घेऊन निजला होता. त्रिंबकरावांच्या हांकांनीं तो जागा झाला व डोक्यावरचें पांघरूण बाजूला करून तो वर पाहूं लागला.

"कोण पाहिजे तुम्हांला ?" त्यानें विचारलें.

"केशवराव काकडे !" त्रिंबकराव मागें वळून म्हणाले.

"केशवराव रात्रीचे कसचे घरीं सांपडायचेत ! कां उगीच घसा दुखवितां ?" तो इसम जरा चमत्कारिक स्वरांत म्हणाला.

"मग कुठें सांपडतील ?" त्रिंबकरावांनीं आश्चर्यानें विचारलें.

"जा, त्या तिकडे—!" त्या इसमानें पांघरुणांतून हात बाहेर न काढतांच खुणावल्यासारखें केलें. रात्रीच्या अंधारांत त्रिंबकरावांना कांहींच दिसलें नाहीं. ते त्याला अधिक विचारणार—पण इतक्यांत तो इसम तोंडावर पांघरूण ओढून झोंपला देखील !

आतां मात्र त्रिंबकरावांची कंबरच खचली ! त्यांच्या सहनशक्तीची परिसीमा

झाली. ते जागच्या जागीं खिळल्यासारखे उभे राहिले. त्यांना पाऊलही उचलवेना!

" त्रिंबकराव, अहो, असें काय करतां? इकडे या!" गोविंदाचा आवाज त्यांच्या कानीं आला, " असें घाबरून कसें चालेल? मी सांगतों तुम्हांला केशवराव कुठें आहेत तें!"

" कुठें?" त्रिंबकरावांनीं निर्जीवपणें विचारलें.

" तुम्हांला काय करायचंय कुठें तें? मी नेतों तिथें तुम्हीं चला म्हणजे झालें! माझेंच चुकलें आधीं! माझ्या ध्यानांतच राहिलें नाहीं, कीं केशवराव या वक्ती घरीं नसणार म्हणून!"

" म्हणजे, तूं म्हणतोस तरी काय?" त्रिंबकरावांना कांहींच उमजेना.

" तें नाहीं तुमच्या ध्यानांत यायचं! तुम्ही माझ्याबरोबर चला तर खरे! जागा दाखविण्याचं काम आपलं! पुढचं काम तुमचं तुम्ही करा म्हणजे झालें!"

" अरे, पण ते गेले असतील तिथें ब्रॅण्डीची बाटली कशी मिळणार? ते कांहीं खिशांत बाटली घेऊन हिंडतात, थोडेच!"

" तुम्ही बसाना मुकाट्यानं तांग्यांत! अहो, तिथें तर डबल सांठा सांपडायचा! माझं चुकलं तर मग पुढें बोला!" गोविंदा हंसत हंसत म्हणाला.

गोविंदा एवढें सांगतो आहे, तर शेवटचा प्रयत्न एकदां करून पाहूं—नाहीं तर मग आहेच ढेकणे मास्तरांचें पोर आणि त्याचें नशीब! आपण तरी याच्यापेक्षां जास्त काय करणार? अशा विचारानें ते पुन्हां तांग्यांत येऊन बसले. गोविंदानें तांगेवाल्याच्या कानांत कुजबुजून कांहीं तरी सांगितलें.

थोडया वेळांत तांगा एका गल्लीच्या टोंकाशीं येऊन उभा राहिला. इतक्या रात्रीं त्या रस्त्यांतून लोकांची रहदारी चाललेली पाहून त्रिंबकरावांना जरा आश्चर्य वाटलें. कांहीं घरांतून दिव्यांचा झगझगाट दिसत होता, तर कांहीं ठिकाणीं गाणेंबजावणें चालू असल्याचें त्यांना ऐकूं येत होतें. आपण पूर्वी कधींच कसे इकडे आलों नाहीं, याचें त्रिंबकरावांना नवल वाटलें. कदाचित् मुसलमानांचा एखादा सण असेल म्हणून ही आरास अन् दंगल चाललेली असावी असाही तर्क एकदां त्यांच्या मनांत आला.

गोविंदानें तांग्यांतून बसल्या बसल्याच एका माडीवरच्या उघडया खिडकीकडे बोट दाखवून त्रिंबकरावांना सांगितलें, " ती उघडी खिडकी दिसते आहे

ना ! तीच माडी ! तिथेंच केशवराव बसले असतील ! त्या जिन्यानें वर जा बेशक अन् करून या आपलें काम फत्ते ! पण माझें नांव सांगूं नका अं ! नाहीं तर म्हणाल मला गोविंदानें इथें आणलं म्हणून अन् कापाल माझी मान सपशेल ! ”

त्रिंबकराव खालीं उतरून भीत भीत त्या जिन्यापर्यंत गेले. कां कोण जाणे, पण त्या जिन्यानें वर जाण्याचा त्यांना धीर होईना ! इतक्या रात्रीं भलत्या ठिकाणीं केशवरावांना त्रास द्यावयाला जाणें बरें नाहीं. काय म्हणतील आपल्याला ते ! पण न जावें तर ब्रॅण्डीची बाटली मिळणार कशी आणि ढेकणे मास्तरांचें पोर वांचणार कसें ? बिचारे ढेकणे आणि त्यांची बायको ! आपल्या वाटेकडे डोळे लावून बसलीं असतील ! आपण जर हात हलवीत परत गेलों तर केवढी निराशा होईल त्यांची ! नाहीं—असा अवसानघात करणें बरोबर नाहीं. येथपर्यंत आलों तसें पुढें जावयाला पाहिजे; मग काय होईल तें होवो !

पाय न वाजवितां त्रिंबकराव त्या जिन्यांतून हळूच वर गेले. वरचें दार लागलेलें होतें. आतां पुढें काय करावयाचें ? त्या दाराला एक लहानसें भोंक होतें. त्यांतून आंतील उजेड बाहेर येत होता. त्या भोंकाला एक डोळा लावून त्रिंबकराव आंत पाहूं लागले.

तों खरेंच ! गोविंदाची माहिती अगदीं बरोबर होती ! आंत तक्याला टेंकून केशवराव खरोखरच पडले होते ! त्यांच्या बाजूला एक चांदीचें विडयाचें तबक होतें. त्यांतील घागऱ्या असलेल्या अडकित्त्याशीं ते एका हातानें खेळत होते. त्यांच्या अंगांत एक पातळ मलमलीचा सदरा होता. गळ्यांत तांबडया पोंवळ्यांची सोन्याच्या तारेंत विणलेली दोन पदरी माळ होती. त्रिंबकरावांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं पूर्वी कधीं ही माळ पाहिलेलीच नव्हती. कारण प्रसंगच नव्हता कधीं. हपीसाच्या कडक ऐटबाज पोषाखांत त्यांना पाहण्याची त्रिंबकरावांना संवय असल्यामुळें केशवरावांचा तो अगदीं मोकळा आणि घरगुती पोषाख पाहून त्यांना जरा मौज वाटली. हसूंही आलें त्यांना जरा. आणि केशवरावांच्या तोंडावर नेहमीं असणाऱ्या करडेपणाचा यावेळीं मागमूसही नव्हता. उलट त्यांचा चेहरा इतका प्रसन्न दिसत होता कीं, त्रिंबकरावांना वाटलें, इतकी प्रसन्नता त्यांच्या कडक मुद्रेवर शोभतच नव्हती. त्यांच्या शेजारी एक स्त्री बसलेली दिसत होती. ती पाठमोरी बसली असल्याकारणानें तिचा

चेहरा त्रिंबकरावांना दिसला नाहीं. पण एकंदरींत तिची बसण्याची पद्धत व हातवारे करून बोलण्याची रीत त्यांना मुळींच आवडली नाहीं. आजच संध्याकाळीं आपण मुलगी पहावयाला गेलों होतों; ती कशी अदबशीर गुडघ्यांत मान घालून बसली होती ? तसें बसणें बायकांना शोभतें. हें काय अगदींच—त्रिंबकरावांना कोणता शब्द योजावा तेंच कळेना. आणि पुन्हां केशवरावांसारखा माणसांशीं तिनें इतका लघळपणा करावा हें तर त्यांना मुळींच आवडलें नाहीं. किती केलें तरी केशवराव म्हणजे कांहीं सामान्य माणूस नाहीं. आज नाहीं उद्यां हेडक्लार्क होणार ! त्रिंबकरावांना तेवढ्यांत त्या बाईचा फार राग आला. तथापि केशवराव तरी तिच्याशीं काय इतकें हंसून खेळून बोलत आहेत हेंच त्यांना कळेना !

पण आतां कसें जावें ? केशवरावांना हांक कशी मारावी ? त्रिंबकराव पुन्हां बुचकळ्यांत पडले. आंतून दार लावलें असेल अशा समजुतीनें ते दाराच्या बाहेरच्या फळीवर जरा रेलले, तों काय—

दार एकदम फटकन् उघडलें व त्रिंबकराव कोलमडत आंत जाऊन पडले !

रात्रीं पुण्याच्या रस्त्यांतून जातांना ड्रेनेजच्या उघड्या भोंकांतून ते आंत गडप झाले असते तरी त्यांना स्वतःला इतकें वाईट वाटलें नसतें, इतक्या अनपेक्षित तऱ्हेनें तो प्रकार घडून आला. ते इतके घाबरले, इतके भ्याले, इतके लाजले कीं त्यांना मेल्याहून मेल्यासारखें झालें. चटकन् उठून न बसतां ते तसेच किंचित्काळ जमिनीवर निपचीत पडून राहिले.

कडकडून विंचू डसावा तसे केशवराव ताडकन् उठून उभे राहिले. अंगावर झुरळ चढावें तशी ती स्त्री ' इ ऽऽऽ!' करून किंचाळली व केशवरावांच्या पाठीमागें पळाली !

वरील पटईच्या पोटांतून पिकलेल्या पेरूसारखे त्रिंबकराव पटकन् खालीं पडले असते तरी केशवराव इतके स्तंभित झाले नसते. खांबांतून नरसिंह बाहेर पडलेला पाहून हिरण्यकश्यपू देखील इतका घाबरला नसेल—इतका संतापला नसेल !

" कोण त्रिंबकराव ? " अन्नछत्रांतील आचाऱ्याच्या भसाड्या सुरांत केशवराव गरजले.

खाटकाच्या सुरीखालीं डोळ्याच्या कवड्या करून थरथर कांपत पडणाऱ्या बकऱ्याच्या निर्जीव नजरेनें त्रिंबकरावांनीं केशवरावांकडे एकवार पाहिलें. ललितांतल्या राक्षस पाटर्यांप्रमाणें केशवराव विक्राळ दिसत होते. त्यांच्या करड्या मिशा रागावलेल्या बोक्याच्या शेंपटीप्रमाणें पिंजारलेल्या होत्या. त्यांचे डोळे एंजिनमधल्या जळत्या दगडी कोळशाप्रमाणें लाल झाले होते. किंचित् ओंठ उघडून दांत विचकण्याचा त्रिंबकरावांनीं प्रयत्न केला. न जाणों, आपण हंसलों म्हणजे कदाचित् केशवरावांचा राग कमी होईल. पण त्यामुळें ते अधिकच भडकले.

" आणखी दांत विचकतोस—बत्तिशी पाडून टाकीन ! " हातांतील अडकित्ता उगारून केशवराव ओरडले, " गद्ध्या, कशाला धडपडलास इथें ! बोल—"

केशवरावांचा तो रौद्र अवतार पाहून त्रिंबकराव अगदीं गर्भगळित झाले. ते अर्धवट उठून बसले व हात जोडून कांपत कांपत म्हणाले, " साहेब, माफ करा—मी आपल्या पोरासारखा, आपण माझें लग्न जुळविलें—"

" चुलींत गेलें तुझें लग्न आणि तूं ! तुझा हा गुण मला माहीत असता तर मी तुझ्या लग्नाच्या भानगडींत कधींच पडलों नसतों ! पाजी कुठला ! तूं या फंदांतला आहेस हें मला ठाऊक नव्हतं ! " आपण स्वतः कोठें आहोंत व कोणाच्या घरीं बोलतों आहोंत हें रागाच्या भरांत केशवराव अजिबात विसरल्यासारखे दिसले.

" न-नाहीं साहेब, मी खरंच सांगतों—मी आपल्याकडेच आलों—" त्रिंबकरावांच्या डोळ्यांतून आतां पाणी वाहूं लागलें.

" माझ्याकडे आलास ? " केशवराव मेघाप्रमाणें गडगडले, " कुणीं सांगितलं तुला मी इथं आहें म्हणून ?—"

" कु-कुणी नाहीं—मी-मी सहज इकडे हिंडायला आलों होतों तों—" गोविंदाचें नांव लपविण्यासाठीं त्रिंबकराव कांहीं तरी सबब सांगावयाला गेले, ती त्यांच्याच अंगावर आली !

" सहज फिरत होतास तूं इकडे ? मला वाटलंच तें ! सहज कसचा-नेहमीं-चाच फिरणारा दिसतो आहेस तूं या बाजूचा ! एकेचाळीस रुपये मिळविणारा तूं ! तुला कशाला हे ढंग ? म्हणे मी फिरायला आलों ! आलास तो आलास

आणि या घरांत कशाला शिरलास मरायला ? आणि पुन्हां वर खोटं बोलतोस ! म्हणे मी तुमच्याकडे आलों !"

"नाहीं साहेब–मी खोटं बोलत नाहीं—या मातोश्रींच्या पायाशपथ सांगतों–माझं खरंच तुमच्याकडे काम होतं !"

त्रिंबकराव त्या स्त्रीच्या पायाला हात लावणार होता, पण ती चटकन् मागें झाली.

"माझ्याकडे कां यांच्याकडे ?" केशवराव तिच्याकडे बोट दाखवून दांत खात म्हणाले, "धडधडीत वर चढून येतोस इथं आणि पुन्हां थापा मारतोस ! हें काय माझं ऑफिस आहे ? आणि मला भेटायची वेळ काय रात्रीचे ११॥ वाजतां असते ? चल हो खालीं—बेवकूफ ! चांगला सांपडलास ! तरी म्हणतों आठ वर्षें कसा राहिला लग्नावांचून ! उद्यां तूं ऑफिसांत तर ये—"

त्रिंबकरावांनीं केशवरावांच्या पायाशीं साष्टांग नमस्कार घातला. "नाहीं–नाहीं साहेब—मी तुमच्या पायां पडतों—मी खोटं बोलत नाहीं—अगदीं दत्ताच्या शपथ सांगतों—खरंच तुमच्याकडे आलों होतों. मला एक ब्रॅण्डीची बाटली पाहिजे होती—"

"ब्रॅण्डी !" राणा भीमदेवाप्रमाणें उडी मारून केशवराव ओरडले. त्यांच्या आश्चर्याचा व संतापाचा आतां कडेलोट झाला. प्लेगच्या गोळ्यावर काळपुळी उठावी, आगीच्या उसळणाऱ्या डोंबांत वीज तुटून पडावी, तशी त्यांच्या भडकलेल्या क्रोधांत आणखी ब्रॅण्डीची बाटली ओतली गेली ! त्यांच्या कपाळाच्या व गळयाच्या शिरा ताड ताड उडूं लागल्या. त्यांचा आवाज एकदम घोगरा पडला. त्यांना आतां बोलतांच येईना मुळीं !

हा त्रिंब्या म्हणजे मनुष्य आहे का कोण आहे ? याच्या निर्लज्जपणाची कमाल झाली ! असल्या ठिकाणीं धडधडीत येतो आणि बिनदिक्कत पुन्हां ब्रॅण्डी मागतो ! यानें कमाई तरी आणखी कोणकोणत्या व्यसनांची करून ठेविली आहे ? आज आठ वर्षें हपीसांत हमालाप्रमाणें राबणारा—कधीं मान उचलून वर न पाहणारा—कधीं तोंडांतून भलता शब्द न काढणारा हा माणूस, इतका फंदी—इतका छंदी व इतका गद्धा असेल अशी कल्पना नव्हती. धडधडीत ब्रॅण्डी मागतो आहे आपल्याला आणि असल्या जागीं येऊन !

केशवराव संतापानें जवळ जवळ वेडे झाले. या मूर्खाशीं जास्ती बोलण्यांत अर्थच नाहीं–चांगलाच प्यालेला दिसतो आहे हा, असें समजून त्यांनीं त्रिंबकरावांची गचांडी धरली व त्यांना जोरानें दाराबाहेर ढकलून दिलें. जिन्यावरून गडगडत खालीं येऊन त्रिंबकराव रस्त्यावर पडले व विव्हळूं लागले.

त्या रस्त्यावरून जाणाऱ्यायेणाऱ्यांना तसलें दृश्य परिचयाचें होतें म्हणूनच कीं काय, त्यांच्याकडे फारसें कोणीं लक्ष दिलें नाहीं.

"पैसे नसतील खिशांत म्हणून खाल्ला असेल मार झालं!" कुणीं तरी जातांना पुटपुटलेलें त्रिंबकरावांनीं अर्धवट ऐकलें.

कांहीं वेळानें ते आपोआप उठले. त्यांनीं आपले कपडे साफसूफ केले. व लंगडत लंगडत ते टांग्याकडे गेले. सुदैवानें त्यांना फारसें लागलेलें नव्हतें.

गोविंदा कोंपऱ्यावरील एका दुकानांत पान खात बसला होता. त्रिंबकरावांना इतका वेळ कां लागला म्हणून तो फिकीरींतच होता. इतक्यांत त्यांना टांग्याकडे येतांना पाहून तो धांवतच आला व त्यानें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें, "आणली?"

"हो–आणली!" त्रिंबकराव चिडून म्हणाले, "चल चालता हो!"

त्रिंबकरावांची बदललेली वृत्ति पहातांच गोविंदा जागचे जागींच बिचकून थबकला. "म्हणजे?" तो उद्गारला.

त्याच्याकडे दुर्लक्ष्य करून ते टांग्यांत बसले व त्यांनीं टांगा घराकडे हांकावयाला सांगितला. गोविंदा तोंडांत बोट घालून टांग्याकडे पहातच उभा राहिला! काय पाजी बामण आहे हा? इतका त्रास घेऊन त्याला ब्रॅण्डीची बाटली मिळवून दिली ती एकटाच घेऊन पसार झाला! म्हणजे आमची एवढी खटपट फुकटच वाटतं! बरं आहे–उद्यां हपिसांत तर ये म्हणजे सांगतों सगळ्यांना! एकटा पितो काय? गोविंदा रागानें स्वतःशींच बडबडत चालता झाला.

टांगा घरापुढें थांबतांच झोंपेंतून चालणाऱ्या माणसाप्रमाणें त्रिंबकराव टांग्यांतून खालीं उतरले. खिशांतली चुरमुडलेली नोट त्यांनीं टांगेवाल्याच्या हातावर ठेविली व ते सरळ घरांत शिरले. आपल्या पदरांत काय पडलें आहे हें लक्षांत येतांच, शर्यतीच्या घोड्याप्रमाणें टांगेवाल्यानें आपला घोडा पिटाळला व तो निमिषांत अंधारांत गडप झाला.

अंगणांत एक धुरकट कंदील जळत होता. त्याच्या उजेडांत ढेकणे मास्तर डोक्याला उपरणें गुंडाळून बसलेले दिसत होते. गुडघ्यावर सदरा ओढून शेजारीं बाबू बसला होता. पलीकडच्या खोलींत कोणीतरी रडत होतें. काय प्रकार झाला हें उमगताच त्रिंबकराव भानावर आले. केवळ आपल्यामुळेंच बिचारें पोर प्राणाला मुकलें असें त्यांना वाटलें. ते ढेकणे मास्तरांच्या शेजारीं जाऊन मटकन् बसले व एखाद्या पापी माणसाप्रमाणें त्यांनीं गुडघ्यांत मान घातली.

" ईश्वराची इच्छा ! " कांहीं वेळानें लांब सुस्कारा टाकून ढेकणे मास्तर म्हणाले, " चला आतां–पुढच्या व्यवस्थेला लागलं पाहिजे ! आतां उशीर कशाला ? "

धोतरांत मूल गुंडाळून मास्तर पुढें झाले. हातांत कुदळ घेऊन त्रिंबकराव मागून चालूं लागले. बाबूनें हातांत कंदील घेतला.

पहांटे स्मशानांतून परत येतांना आपण आपली नोकरी–लग्न–डबोलें–पुढच्या साऱ्या आशा तेथें पुरून येत आहोंत कीं काय, असें त्रिंबकरावांना वाटलें.

३

दुसरे दिवशीं त्रिंबकराव हपीसांत आलेच नव्हते. ते आजारी असल्याची चिठी आली होती.

" आजारी पडेल नाहीं तर काय !–सबंध एक बाटली म्हणजे काय चेष्टा आहे ? " गोविंदा दांतओठ खाऊन स्वतःशींच जळफळत होता.

केशवरावांच्या अंगांत त्या दिवशीं सैतानच संचारला होता. ते ज्याच्या त्याच्या अंगावर कातवून ओरडत होते–कागद फेंकीत होते–हातपाय आपटीत होते. शिव्याशिवाय त्या दिवशीं त्यांच्या तोंडून शब्दच बाहेर पडत नव्हता.

काय प्रकार झाला असावा याचा कोणासच तर्क होईना !

मधल्या सुटींत कारकून मंडळी चहा घेत उभी होती. तेव्हां गोविंदा पट्टेवाला हंसून प्रत्येकाच्या कानांत कांहीं तरी कुजबुजत होता.

" आश्चर्य आहे बुवा ! " ज्याच्या त्याच्या तोंडून उद्गार निघाले.

" तरीच परवां स्वारी पट्टी खात होती !–आतां कळलं ! " कुणी तरी म्हणाले.

" छे: ! आठ वर्षें झालीं तरी माणूस कळत नाहीं ! मनुष्यप्राणी म्हणजे एक कूट प्रश्न आहे असें कोणीसें म्हटलें आहे ना, तें अगदीं खरं ! " एक तत्त्वज्ञानी उद्गारले

" बाकी असला माणूस आपल्या हपीसांत उपयोगी नाहीं ! आपला घात करायचा एकादे वेळीं ! " एकानें धोक्याची सूचना दिली.

तिसरे दिवशीं मान खालीं घालून कांपत कांपत त्रिंबकरावांनीं हपीसांत प्रवेश केला. कोणाकडे न पाहतां ते सरळ आपल्या जागेवर जाऊन बसले. त्यांची छाती धडधडत होती. पाय लटपटत होते. थोड्या वेळानें हळूच वर बघण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. आपल्याकडे कारकून मंडळी आज चमत्कारिक नजरेनें पहात आहेत, हें त्यांच्या ताबडतोब लक्ष्यांत आलें. फिरून त्यांनीं कोणाकडे बघितलेच नाहीं. कसले तरी कागद काढून ते चाळूं लागले. पण त्यांच्याकडे त्यांचें लक्ष नव्हतें. त्यांचें डोकें सुन्न झालें होतें. केशवराव आले नव्हते म्हणून त्यांना जरा समाधान वाटलें.

इतक्यांत गोविंदानें त्यांच्या नांवाचा एक लखोटा आणून त्यांच्यापुढें ठेवला. भीत भीत त्यांनीं तो हातांत घेतला व मनाचा धीर करून फोडला. आंतील कागदावरचा मजकूर त्यांच्या दृष्टीस पडला नाहीं तोंच त्यांना चक्कर आली. हातांतील कागद एकदम गळून खालीं पडला. टेबलावर मान टाकून ते स्वस्थ पडले.

कांहीं वेळानें ते शांतपणें उठले. धोतराच्या सोग्यानें त्यानीं आपलें तोंड पुसलें. आपल्या कपाटाचे खण बंद करून त्याच्या किल्ल्या शेजारच्या कारकुनाच्या टेबलावर हळूच ठेविल्या व छत्री घेऊन ते मंद पावलांनीं हपीसाच्या बाहेर पडले.

गोविंदा पट्टेवाला उभा राहून त्यांच्याकडे पहात हंसत होता.



# जांबुवंत दंतमंजन

उशाखालीं बिनपुठ्ठयांचा आपट्यांचा लठ्ठ संस्कृत कोश आणि पायाखालीं जुन्यापुराण्या 'गद्यपद्यार्थबोधा'चे गठ्ठे घेऊन बगाराम लवंडलेला होता. लवंडलेलाच होता, पसरला नव्हता. कारण हातपाय पसरण्याला त्या ठिकाणीं फारशी जागाच नव्हती. सदर्न मराठा रेल्वेच्या तिसऱ्या वर्गांतला ताटकळलेला प्रवासी झोंप अनावर झाल्याकारणानें टूंकांच्या आणि गाठोड्यांच्या खबदाडींत थोडासा अवसर काढून ज्या पवित्र्यांत स्वतःचें शरीर सामावून घेतो—अगदीं तशाच प्रकारच्या पवित्र्यांत बगाराम पडलेला होता. त्या दोन खणांच्या अरुंद व चिंचोळ्या खोलींत बगारामाची नेहमींची बसावयाची जागा वजा केली तर बाकीच्या जागेंत जितकीं पुस्तकें मावणें शक्य आहे तितकीं पुस्तकें खच्चून भरलीं होतीं. जिकडे नजर टाकावी तिकडे बुकेंच बुकेंच !

**खालीं बुकें—वरतीं बुकें । इकडे बुकें-तिकडे बुकें !**

आळंदीला जाणाऱ्या भाडोत्री मोटारगाडींत जितकी कोंबाकोंब होत नसेल—गालीचे पहावयास जाणाऱ्या हौशी पुणेंकर नर-नारींची सोमेश्वराच्या देवळांत जितकी झुंबड माजत नसेल, मुंबईच्या सात रस्त्यावरील चाळींतल्या खोलींतील रहिवाशांची जितकी दाटीवाटी होत नसेल, किंवा—किंवा पहिल्या तारखेस सरकारी तिजोरीवर थकलेल्या पेन्शनरांची जितकी खेचाखेच होत नसेल तितकी दाटी आणि गर्दी त्या टीचभर जागेंत माजलेली दिसत होती.

पुस्तकांच्या संग्रहाला कुणी वाचनालय म्हणतात, कुणी 'ज्ञानमंदिर' म्हणतात; पण ज्या रंगारूपाच्या व स्वरूपाच्या पुस्तकांची त्या ठिकाणीं मंडई माजली होती, त्या स्थळास 'पुस्तकांचा पांजरपोळ' किंवा 'अनाथ ग्रंथाश्रम' यापेक्षां अधिक दर्जाचें नांव द्यावयास कोणीं धजलें नसतें. पांजरापोळांतल्या निकामी आणि सांगाडेवजा चतुष्पाद रहिवाशांप्रमाणें किंवा अनाथ बालका-

श्रमांतील केंविलवाण्या चेहऱ्याच्या पितृहीन अर्भकांप्रमाणें तेथील पुस्तकांची कळा दिसत होती. कोणाचे पुठ्ठे बेपत्ता झाले होते, तर कोणाची बांधणी ढांसळल्यामुळें अंगावरून वारें गेल्याप्रमाणें असहाय स्थिति झाली होती. कांहीं पुस्तकांची 'पालवी' अजिबात गळून पडल्यामुळें त्यांना शिशिरऋतूंतील झुडपांची कळा आलेली होती. कांहीं ग्रंथांचे कोपरे कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडल्यामुळें महायुद्धांतून परत आलेल्या जखमी सैनिकांप्रमाणें त्यांचे चेहरे चिंबटलेलें दिसत होते; तर कांहींचे अर्धभग्न देह लक्ष्मीरोडवर म्युनिसिपालिटीनें पाडलेल्या घरांप्रमाणें भकास दिसत होते. निरनिराळ्या जाडीचे आणि लांबीरुंदीचे लहानमोठे ग्रंथ, पुस्तकें, आणि चोपडीं, आपापला पूर्वींचा दर्जा व वैभव विसरून सहभोजनाला बसल्याप्रमाणें एकत्र बसलेलीं होतीं. हा मोठा व तो छोटा हा आपपरभाव त्यांच्यांत दिसून येत नव्हता. तसें पाहिलें तर बडवंचीच्या वरच्या फळीवर ठेविलेल्या पुस्तकांवर पावसाळ्यांत रुद्राभिषेक होत असल्यामुळें इतर पुस्तकांपेक्षां चारदोन पावसाळ्यांचा अनुभव त्यांना जास्तीच होता; पण या वडीलकीची जाणीव असल्याचें चिन्ह त्यांच्या तोंडांवर मुळींच दिसून येत नव्हतें.

'योगवासिष्ठा'च्या खांद्यावर मान टाकून 'ठकसेन राजपुत्र' झोंपीं गेला होता. तर 'महाभारता'च्या अंगाखांद्यावर 'गुलबकावली' खेळत बसलेली होती. आणि 'निबंधमाला' तर खेसे आणि तुपे यांच्या डायरीबरोबर बोलत बसलेली दिसत होती. पटवर्धनांची 'भूगोलविद्येचीं मूलतत्त्वें' जी. आय्. पी. रेल्वेच्या टाईम टेबलाशीं दोस्ती करून होती आणि 'तुकाराममहाराजां'च्या मांडीला मांडी लावून 'पठ्ठे बापूराव' बसलेला दिसत होता. एकंदरींत नळबाजारांतल्या दुकानांतला बेजबाबदारपणा, काष्ठौषधींच्या दुकानांतील जुनाटपणा, सर्कशींतल्या शिकारखान्यांतील वैचित्र्य, मोटारदुरुस्तीच्या कारखान्यांतील गैदीपणा आणि अंत्यविधीच्या सामानाच्या दुकानांतील ओंगळपणा यांच्या बेरजेचें घनमूळ त्या ठिकाणीं प्रत्यक्षपणें काढलेलें दिसत होतें.

'बजरंग बुकडेपो' बगारामानें दोन वर्षांपूर्वींच काढला. मुंबई युनिव्हर्सिटीचे माजी रजिस्ट्रारसाहेब खा. ब. फर्दुनजी दस्तुर यांनीं मॅट्रिक परीक्षेंत बगारामला आठ वेळां 'वन्समोर' दिल्याकारणामुळें, त्या आठ वर्षांत सांठलेल्या पुस्तकांच्या भांडवलावर बगारामाने 'बजरंग डेपो' उघडण्याचें

ठरविलें. शाळेंत असतांना बगाराम ' गरीब विद्यार्थीसंघा ' चा चिटणीस होता. त्या वेळीं ' गरीब मुलां 'च्या नांवावर चार घरें माधुकरी मागून त्यानें जुन्या पुस्तकांचा जो जोगवा गोळा केला होता, तो शाळा सोडतांना शिक्षकांच्या न कळत बगारामानें आपल्या बिऱ्हाडीं केव्हांच सुपूर्द केला होता. त्याची भरती स्वतःच्या भांडवलांत घालून बगारामानें भर बुधवार चौकांत एका चांभाराच्या दुकानाशेजारीं दोन खणांची जागा घेऊन दुकान सुरूं केलें. उपवर मुलगी, अध्यक्षांचा समारोप व जुन्या पुस्तकांचें दुकान कसें वाढत जातें हें कळत नाहीं. दोन वर्षांच्या अवधींत ' बजरंग ' डेपोचें शेपूट इतकें वाढत गेलें कीं, त्याचा विस्तार आवरतां आवरतां बगाराम मेटाकुटीस आला. पुणें शहरांतील प्रतिवर्षी वाढणारी विद्यार्थ्यांची बेसुमार संख्या, अभ्यासक्रमांत वारंवार बदल करून पालकांना पाचुंद्यावारी पुस्तकें विकत घ्यावयाला लावणारें शाळाखातें, मुलांना हातखर्चास देतांना हात आंखडणारे कंजुष पालक, गल्लोगल्लीं देवींच्या सांथीप्रमाणें उपटणारीं विश्रांतिगृहें, व तेथील भजीं, मिसळ, पातळ भाजी इत्यादि पंचपक्वान्नांच्या दर्शनानें खवखवणारीं विद्यार्थिवर्गाचीं पोटें आणि भुकेच्या पोटीं वाटेल तें पाप करण्यास तयार होण्याची मानवी प्रवृत्ति इत्यादि सर्व गोष्टींचा एकसमयावच्छेदेंकरून विचार केला म्हणजे जुन्या पुस्तकांच्या दुकानांची अशी भूमितिश्रेणींत कां वाढ होत जावी हें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

कोऱ्या पुस्तकांनीं बगारामाला जितका हात दिला नसेल तितका जुन्या पुस्तकांनीं दिला. ' जुनें तें सोनें ' म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. जुन्या पुस्तकांच्या विल्हेवाटीनें मिळविलेल्या कमाईच्या जोरावर नव्या पुस्तकांचें दुकान काढण्याची कल्पना बगारामाच्या डोक्यांत अलीकडे डोकावूं लागली होती. एवढेंच काय पण एक छापखाना, त्याच्या जोडीला एक मासिक, पुढें वर्तमानपत्र—! एकापेक्षां एक बेत बगारामाच्या डोक्यांत घोळत होते. बाटल्यांचें दुकान काढणाऱ्या जमशेठजी जिजीभाईच्या डोक्यांत इतका विचारांचा कल्लोळ उडाला नसेल ! छापखान्यांत खिळे जुळविणाऱ्या जावजी दादाजीच्या तरुण मेंदूंत इतक्या आकांक्षा नाचत नसतील—

पण या त्याच्या सर्व आकांक्षा—सर्व विचार—सर्व बेत—गेल्या आठवड्यांत पार रसातळाला गेले. गेल्या आठवड्यापासून त्याला आयुष्य निःसार वाटूं

लागलें. कशांत कांहीं गोडी वाटेना. तो भ्रमिष्टासारखा बनला. दोन वर्षांत कमावलेली त्याची व्यापारी धूर्तता नादान ठरली. आजच सकाळीं दीड रुपयांचें पुस्तक त्यानें दीड आण्याला विकलें. दुकान वाढविण्याचेऐवजीं तो तें बंद करण्याच्या गोष्टी बोलूं लागला. शेजारच्या चांभाराला त्यानें परवांचेच दिवशीं तसें सांगितलें. लांब सुस्कारा टाकण्यापलीकडे आणि स्वस्तांत पडलें तर दुकान विकत घेण्याची तयारी दाखविण्यापलीकडे बिचारा चांभार तरी काय करणार ? तो जास्ती चांभारचौकशी करण्याच्या भानगडींत कशाला पडतो ! आज आठ दिवसांत बगाराम वेळेवर क्वचितच जेवावयाला गेला असेल. साऱ्या दिवसभर दुकानांत स्वस्थ पडून राही व कसला तरी विचार करी. बगारामाच्या या मानसिक रोगाचें कारण—

बगाराम प्रेमपाशांत सांपडला होता. बगाराम मदनविद्ध झाला होता. बगारामाच्या हृदयाच्या दुष्ट पंचशरानें आपल्या तीव्र बाणांनीं चिंधड्या चिंधड्या उडविल्या होत्या. म्हणून तो इतका विव्हल झाला होता; इतका दिङ्मूढ होऊन गेला होता.

आजपर्यंत पुस्तकांचे दुकानदार अनेक संकटांत सांपडले असतील ! अनेक आपत्तींत अडकले असतील ! पण प्रेमाच्या पाशांत पाय अडकवून घेणारा बगाराम हा पहिलाच पुस्तकविक्या असेल ! मदनाची जप्ती ज्याच्यावर बजावली गेली असेल असा हा पहिलाच जीर्ण ग्रंथांचा विक्रेता असेल !

तासचे तास बगाराम असा लवंडून पडे ! अंतःकरणाची व्यथा सांगावयाची कोणाला आणि ती कळणार तरी कोणाला ! शरीराला इजा झाली तर वैद्याकडे जातां येतें—घराला आग लागली तर म्युनिसिपालिटीचा बंब बोलावितां येतो; पण अंतःकरणांत प्रेमाचा वन्हि पेटला तर तो दाह विझवावयाला कोणता बंब आणावयाचा ? हृदयांतील जखमांवर पट्टया बांधावयाला कोणत्या इस्पितळांत जावयाचें ? प्रेमानें दृष्टि अंध झाल्यावर कोणत्या चष्मेवाल्या डॉक्टरकडे धांव घ्यावयाची ?

* * *

**बगारामाच्या 'बजरंग बुकडेपो'च्या अगदीं समोर एक नवीन चहाचें दुकान सुरू झालें होतें. ह्या दुकानाच्या मालकाची ओळख करून देण्याची**

कांहीं जरुरी नाहीं. कारण त्यांच्या दुकानाच्या पाटीवर ' सबंध हिंदुस्थानांत प्रख्यात असलेले तात्याबा मंचरकर ' असा त्यांचा उल्लेख केलेला होता. सबंध हिंदुस्थानांत कोणत्या कामगिरीच्या जोरावर तात्याबा मंचरकरांनीं एवढी प्रख्याति मिळविली हें कळणें गूढ असलें तरी ते प्रख्यात नसावेत असें खात्रीपूर्वक मात्र सांगतां येणें शक्य नाहीं. असतील ! निरनिराळ्या नात्यांनीं ते निरनिराळ्या लोकांना माहीत असूं शकतील—नाहीं कोणीं म्हणावें ? पण आपणांला त्याच्याशीं काय करावयाचें आहे ? तात्याबा माहीत नसतील एक वेळ, पण निदान तात्याबांचा ' पीयूष टी ' तरी तुम्हांला माहीत असेल ! मुंबईचे लोक तर गेलीं तीस वर्षें ' पीयूष टी ' शिवाय दुसऱ्या चहाला हात लावीत नाहींत, असें खुद्द तात्याबांनीं आपल्या पाटीवर लिहिलें आहे ! आणि तें कसें खोटें असूं शकेल ? केवळ पुणेंकरांच्या आग्रहामुळें त्यांनीं मुंबईहून आपलें दुकान पुण्यास आणलें होतें. तात्याबांनीं आपलें हॉटेल पुणें शहरांत आणावें अशी त्यांना विनंति करावयास कोणतें धाडशी ' डेप्युटेशन ' पुण्याहून मुंबईस गेलें तें कळणें शक्य नाहीं. पुणेंकरांवर असे अप्रत्यक्ष उपकार करणारे महात्मे अज्ञातवासांतच राहणार काय ! अरेरे ! आम्हांला त्यांचीं नांवें देखील कळूं नयेत ! तथापि त्यांच्या आग्रहाला मान देऊन आपला व मुंबईकरांचा तीस वर्षांचा ऋणानुबंध तोडून, ' पीयूष टी ' विना अलम् मुंबईची दुनिया तडफडत राहील हें करुण दृश्य डोळ्यांपुढें दिसत असतांही, दगडासारखें घट्ट हृदय करून, केवळ पुण्यपत्तनस्थ जनतेवर उपकार करण्याच्या भावनेनें जो महात्मा त्यागपूर्वक पुण्यांत प्रविष्ट झाला त्याची थोरवी काय वर्णन करावी ?

तात्याबांचें ' नंदनवन विश्रांतिगृह ' सुरू होऊन एक आठवडा होऊन गेला तरी ती बातमी पुणेंकरांना कळल्याची अद्यापि चिन्हें दिसत नव्हती. ' पीयूष टी ' चा सुगंधी सुगावा अजून फारसा कोणाला लागला नव्हता. दुकानाच्या तोंडास एका मोडक्या खुर्चीवर तात्याबा मांडी घालून, आपल्या उघड्या देहानिशीं स्वस्थ बसलेले दिसत. गेल्या तीस वर्षांत पहिल्या प्रथमच त्यांना इतकी विश्रांति मिळाली असावी. आपल्या दुकानांतील ' पीयूष चहा ' कडे दुर्लक्ष करून आजूबाजूच्या इतर चहाच्या दुकानांत शिरणारी अजाण गिऱ्हाईकें पाहून तात्याबांना त्यांची दया येई. पण करणार काय ! त्यांना

गिऱ्हाइकांची थोडीच पर्वा होती ? खऱ्या गुणांची पारख लौकर होत नाहीं या म्हणीच्या आधारावर ते अवलंबून होते.

तात्याबांनीं आपलें दुकान यत्किंचित्‌ही सजविलें नव्हतें. दुकान सजवून लोकांच्या डोळयांत धूळ फेंकण्याच्या ते विरुद्ध होते. त्यांच्या दुकानांत अहोरात्र किंचाळणारा फोनोग्राफ नव्हता, त्यांच्या दुकानांत खाद्यपदार्थांच्या दरांच्या लांबलचक पाट्या नव्हत्या, दुकानाच्या तोंडाशीं कालविलेल्या पिठांत कोंपरा इतके हात बुडवून भजीं तळत बसणारा ‘भजींतळ्या’ नव्हता, त्यांच्या दुकानांत आरसे नव्हते, इराणच्या व तुर्कस्तानच्या माजी पातशहांचे कांचेवर काढलेले फोटो नव्हते—कांहीं नव्हतें ! ‘दोन इसम चार आणे’ म्हणून हंबरडा फोडणारीं कळकट पोरेंहीं नव्हतीं ! त्यांच्या दुकानांत कुणीच नोकर माणूस नव्हतें. दोन टेबलांभोंवतीं मांडलेल्या चार दोन लोखंडी खुर्च्या व एकदोन बांकें, कोपऱ्यांत एका टेबलावर ठेवलेला इतिहास प्रसिद्ध चहाचा बंब, कीं ज्या बंबांतून पडणाऱ्या पीयूष चहाचे पाट गेल्या तीस वर्षे मुंबई-करांनीं आकंठ प्राशन केले होते; शेजारीं कानतुटक्या कपबशांची चवड व पलीकडे एका घडवंचीवर थोडेसे फराळाचे पदार्थ दाखविणाऱ्या कांचेच्या बरण्या.

चहा तयार करण्याचें काम स्वतः तात्याबानें आपल्याकडे घेतलें होतें आणि गिऱ्हाइकांना चहा देण्याचें काम—

त्यांनीं कोणाकडे दिलें असावें अशी तुमची समजूत आहे ? तात्याबांचा नोकरांवर मुळींच विश्वास नव्हता. नोकरांच्यामुळें दुकानाला भाडोत्री स्वरूप येतें अशी त्यांची खात्री होती. विश्रांतिगृहांत कौटुंबिक वातावरण निर्माण केल्याशिवाय त्या ठिकाणीं विश्रांति मिळणें शक्य नाहीं या समजुतीनें त्यांच्या ‘नंदनवन विश्रांतिगृहां’तील इतर सर्व काम त्यांनीं आपल्या मुलीकडे—सुंद्रीकडे सोंपविलें होतें.

हिंदुस्थानच्या विश्रांतिगृहांचा इतिहास लिहिण्याचें कोणी मनांत आणलें तर तात्याबांच्या या अपूर्व सुधारणेचा उल्लेख सोनेरी शाईनें करावा लागेल. तात्याबा हे हॉटेलवाल्यांतील अव्वल दर्जाचे सुधारक होते. पहिला पुनर्विवाह करणारा सुधारक वीर इतका धाडसी नसेल. पहिल्या प्रथम रंगभूमीवर स्त्रीला नाचविणारा नाटक मंडळीचा मॅनेजर इतक्या छातीचा नसेल !

सुंद्री ही तात्याबांची एकुलती एक मुलगी. सुंद्रीचा जन्मकाळ हाच तिच्या आईचा अंतकाळ ठरला. भाग्याची असली पाहिजे ती माऊली, कारण सुंद्रीचा चेहरा तिच्या दृष्टीस पडला असता तर तिनें कायमचे डोळे मिटण्याची परमेश्वराजवळ प्रार्थना केली असती. ही पुढची यातायात नको म्हणूनच कीं काय दयाळु परमेश्वरानें तिच्या आईची आधींच वासलात लावून ठेविलेली होती. सुंद्री व तिचे वडील यांच्यामधलें साम्य लक्षांत घेतलें म्हणजे तात्याबांचे आपल्या मुलीवर इतकें अलोट प्रेम कां होतें हें कळून आलें असतें, आणि पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर तात्याबांनीं दुसरें लग्न कां केलें नाहीं–किंवा लग्न करणें कां शक्य झालें नाहीं, तेंही रहस्य उमगलें असतें.

विषमज्वरांतून उठल्यावर ताबडतोब नाशकासारख्या क्षेत्रांत जाऊन आल्यानंतर तात्याबांचा जसा चेहरा होईल तसा चेहरा कल्पून, त्यांत देवीच्या अनेक वणांची व चारदोन ठळक हिरव्या गोंदवणाची भर घालून व ते मुंडकें एखाद्या फाटक्या बांध्याच्या मुलीच्या शरीराला चिकटविण्याची व्यवस्था केली तर सुंद्रीच्या स्वरूपाची थोडीशी कल्पना होईल. सुंद्रीला पाहिल्यानंतर अजिंठ्याच्या लेण्यांतील भिंतींवर काढलेल्या बुद्ध स्त्रियांची किंवा कलकत्त्याच्या ' मॉडर्न रिव्यू 'मध्यें येणाऱ्या बंगाली चित्रांतील स्त्रियांची आठवण होत असे. तुळशीबागेंत मिळणाऱ्या मातीच्या बाहुल्या जिवंत होऊन जर वाढूं लागल्या तर सोळा सतरा वर्षांत त्या सुंद्रीसारख्या दिसूं लागतील. राउंड टेबल परिषदेच्या हिंदी सभासदांचें एकमेकांमध्यें जितकें ऐक्य होतें तितकेंच सुंद्रीच्या शरीराच्या अवयवांमध्यें दिसून आलें असतें. सुंद्रीचे नाकडोळे घडवितांना व बसवितांना ब्रह्मदेवाच्या कारखान्यांतले पाथरवट चांगलेच निशापाणी करून आले असावेत असा तर्क करावयास हरकत नाहीं. तिच्या दातांची पंगत घर सोडून रस्त्यावर बसलेल्या मराठे लोकांच्या लग्न-पंगतीप्रमाणें ओठांच्या बाहेर येऊन ऐसपैस बसली होती. त्यामुळें तिचें तोंड कवळीसकट छापलेल्या दंतवैद्याच्या जाहिरातीसारखें दिसत होतें. ब्रह्मदेवानें आधीं तिचें डोकें घडवून मागाहून दांत लावण्याऐवजीं, दांतापासून आरंभ करून मग मागें डोकें घडवीत नेलें असलें पाहिजे असें वाटतें. सुंद्रीच्या दांतांच्या पुढें पुराणांतरींच्या राक्षसिणींच्या दातांच्या गोष्टी दंतकथेप्रमाणें भासल्या असत्या. माडीच्या घराच्या सज्जांत डोले पाहावयास बसणाऱ्या पोरांप्रमाणें सुंद्रीचे दांत ओठांच्या

कठड्यांतून डोकावत असल्यामुळें ती हंसते आहे का दांत विचकते आहे हे कळून येणें फार कठीण गेलें असतें.

सुंद्रीकडे पाहिलें म्हणजे सबंध हिंदुस्थानांत तात्याबा मंचरकर कां प्रसिद्ध झाले असतील हे कळावयास फारशी अडचण पडली नसती. आणि त्यांच्या ‘ नंदनवन विश्रांतिगृहांत ’ गेल्या आठवड्यांत एकाहि गिऱ्हाइकानें कां पाऊल टाकलें नाहीं हेंही त्याबरोबर उमगून आलें असतें.

तात्याबांनीं स्वहस्तें बनविलेल्या व सुंद्रीच्या खास हातून मिळणाऱ्या पीयूष चहाचा पहिला घोट घेण्याचें भाग्य बगारामालाच लाभलें. तें भाग्य इतर दुर्दैवी पुणेंकरांच्या नशिबीं नव्हतें.

तात्याबांचें विश्रांतिगृह उघडल्याची वार्ता समोर असून देखील बगारामाला लागली नव्हती. हॉटेल उघडल्यानंतर दोनचार दिवसांनीं एका दुपारीं बगारामाला चहाची तलफ आली; म्हणून आपल्या दुकानची फळी किंचित् ओढून घेऊन तो आपल्या नेहमींच्या हॉटेलाकडे जावयास निघाला.

इतक्यांत बाजूनें तांगा आल्यामुळें थांबून तो समोर बघूं लागला. तों जगप्रसिद्ध तात्याबा मंचरकरांच्या ‘ नंदनवन विश्रांतिगृहा ’ ची पाटी व ‘पीयूष चहाची ’ जाहिरात त्याच्या दृष्टीस पडली. त्याला अचंबा वाटला. क्षणमात्र तो जागच्याजागीं थांबला. आपण आतांपर्यंत समोर कसें पाहिलें नाहीं ! याचें त्याला आश्चर्य वाटलें. कांहीं विचार न करतां तो सरळ त्या हॉटेलांत शिरला. तो स्वतः जुन्या पुस्तकांचा व्यापारी असला तरी नव्या गोष्टीचाही षोकी होता. नेहमींच्या दुकानांतील चहाला आज त्यानें रजा द्यावयाचें ठरविलें.

इतक्या दिवसांनीं आज गिऱ्हाईक आल्यामुळें मनांत झालेला आनंद तात्याबांनीं तोंडावर यत्किंचित्ही दाखविला नाहीं. बगाराम टेबलाजवळ बसतांच चहा नेऊन देण्याविषयीं तात्याबांनीं सुंद्रीला हुकूम सोडला. ‘ नंदनवना ’च्या अंतर्भागाचें किलकिल्या डोळ्यांनीं बगाराम कोठें निरीक्षण करतो आहे, तोंच आंतील अंधारांतून चहाच्या भरल्या पेल्यासकट सुन्द्री प्रकट झाली. तिनें दणकन् तो कप बगारामाच्या पुढें टेबलावर आदळला व बगारामाकडे दांतभरल्या तोंडानें पहात तटस्थ उभी राहिली.

पहिल्या प्रथम तंबाखू खाल्ल्यानंतर अगर चिलीम ओढल्यानंतर माणसाला जसें वाटतें तसें बगारामाला वाटलें. त्याला सबंध खोली फिरल्यासारखें वाटूं

लागलें. त्यानें क्षणमात्र डोळे मिटले व पुन्हां मेणाच्या प्रदर्शनांतील एकाद्या चित्राप्रमाणें तो सुंद्रीकडे ताठरलेल्या पापण्यांनीं पाहूं लागला. चहाच्या पेल्यांतून उडालेल्या गरम शिंतोड्यांनीं त्याच्या हाताला चटका बसला तरी त्याची त्याला जाणीव नव्हती. नागाची फणी पाहून झाडावरचा पक्षी जसा निर्जीव पडतो, पोलिसाचे 'पकडसमान' पाहतांच चोर जसा लुळा पडतो, किंवा ठरल्या वेळीं गिऱ्हाईक आलें म्हणजे शिंपी जसा गांगरून जातो, तसें बगारामाला झालें. तो लुळा पडला—तो गांगरला—तो हतबुद्ध झाला. सुन्द्रीच्या दांतांसारख्या हजारों कवळ्या त्याला आजूबाजूला दिसूं लागून, आपण एकाद्या दंतवैद्याच्या दुकानांत आहोंत कीं काय असा त्याला क्षणमात्र भास झाला.

"घ्या कीं चहा ! बघतां काय ?"

त्या हजारों दांतांतून प्रतिध्वनि निघाल्यासारखें बगारामाला वाटलें. क्षणमात्र आपण एकाद्या गोलघुमटांतच आहोंत अशीच त्याची समजूत झाली. त्यानें डोळे चोळुन डोकें हलविल्यासारखें केलें व समोर पाहिलें.

खोली फिरावयाची थांबली होती. चहा आणून देणारी व्यक्ति पहिल्याच पवित्र्यांत उभी होती.

बगारामानें पुन्हा एकवार निरखून पाहिलें.

सुंद्री हंसत होती. अजूनही ती हंसत होती !

बगाराम लाजला. लाजून खालीं पाहूं लागला. बगारामाकडे पाहून हंसणारी ती पहिलीच स्त्री होती. आणि बत्तीस दांतांसकट हंसणारी स्त्री तर बगारामाला सात जन्मांत पहावयास मिळाली नसती. तेवढ्यांत तिचे दांत मोजून टाकण्याचा मोह बगारामाला झाला—पण त्यानें तो आंवरला.

आतां वर तोंड करून सुंद्रीकडे पाहण्याची बगारामाची ताकदच नव्हती. त्याच्या कानांत कसले तरी हजारों मधुर स्वर निनादत होते. कवड्यांनीं भरलेलीं पोंतीं उंचावरून कोणीतरी ओतीत असल्याचें आवाज ऐकूं येत असल्याचा त्याला भास होत होता.

बगारामानें कसाबसा चहाचा कप तोंडाला लावला. खरोखरच तो अगदीं पीयूषासारखा त्याला वाटला. त्या विश्रांतिगृहाला 'नंदनवन विश्रांतिगृह' असें कां म्हटलें आहे हें त्याला आतां कळून आलें.

खरोखरच नंदनवन आणि त्या नंदनवनांत 'पीयूष चहा'चे कुंभ घेऊन हिंडणारी ती देवता—

बगारामाच्या डोक्यांत असे विचार पूर्वी कधींच आले नसतील. आपणांस आज असें काय होत आहे हें जरी त्याला कळेना तरी आपण कांहीं तरी चमत्कारिक अवस्थेंतून—अननुभूत अनुभवांच्या परंपरेंतून जात आहोंत याची मात्र त्याला जाणीव होत होती.

'लैलामज्नन' चित्रपट संपल्यानंतर नाखुषीनें सिनेमागृहांतून उठणाऱ्या एखाद्या पठाणासारखा भकास चेहरा करून बगाराम कसाबसा उठला. तात्याबांच्या पुढ्यांत निकलची आणेली फेंकून तो दुकानाखालीं उतरला. 'इस तन धनकी कौन बढाई' या पदाचे चरण तात्याबा गुणगुणत बसले होते. त्यांनीं आणेली उचलून एका पत्र्याच्या पेटींत टाकली व ते पुन्हां रस्त्याकडील रहदारीकडे आशाळभूत चेहऱ्यानें पाहूं लागले.

स्वतःच्या दुकानांत शिरतांना बगारामानें पुन्हां मागें वळून पाहिलें. 'नंदनवना'च्या अंतर्गृहांतील आकाशगंगा फिरून चमकल्यासारखें त्याला वाटलें. पुन्हां त्याला पहिला झटका आल्यासारखें झालें. त्यानें दुकान आंतून लावून घेतलें व पुस्तकांच्या एका ढिगांत तोंड खुपसून तो निश्चिंत पडला.

इष्काचा वार बगारामाच्या अगदींच जिव्हारीं बसला. तात्याबाच्या पुढें आणेली फेंकण्याचे आधीं त्यानें आपलें काळीज सुंद्रीच्या हातांत फेंकलें होतें. एक तासाच्या आधीं बगारामाच्या छातींत धडधडणारें हृदय आतां सुंद्रीच्या दांतांच्या कवळींत सांपडलें होतें.

३

तूं कवि होशील असें कोणी बगारामाला आठ दिवसांपूर्वी सांगितलें असतें तर त्याला तें खरें वाटलें नसतें. शेजारच्या चांभाराच्या दुकानाचा तूं अर्धा पातीदार होशील असें त्याला कोणी सांगितलें असतें तर तें त्याला एक वेळ खरें वाटलें असतें. नाताळच्या दिवशीं इराण्याच्या दुकानांत वऱ्याच्या तांदुळाची भगर खात बसतांना तूं आढळशील असें एक वेळ त्याला कोणी सांगितलें असतें तरी त्यावर त्याचा विश्वास बसला असता.

पण कविता करण्याच्या तूं नादांत पडशील–! छेः ! तें शक्यच नव्हतें. बगाराम व कविता या दोन गोष्टींची गांठ पडणें कालत्रयींही शक्य नव्हतें. तथापि विधिघटना फार विचित्र असते. सुंद्रीच्या दंतपंक्तींत अडकून पडणें ही जशी बगारामाच्या आयुष्यांतली एक अपूर्व गोष्ट होती, तशीच किंवा त्याहीपेक्षां अपूर्व व आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे त्यानें कविता लिहिणें ही होती. आठ दिवसांच्या आंतच तो आपल्या दुकानांत इतस्ततः उडणाऱ्या कागदाच्या पाठीवर जागा सांपडेल त्या ठिकाणीं कवितेच्या ओळी खरडतांना दृष्टीस पडूं लागला.

या जगांत कोण केव्हां कविता लिहूं लागेल हें सांगतां येणें शक्य नाहीं. साहेबांच्या आगमनानें कोणाची कवित्वशक्ति राजापुरी गंगेप्रमाणें अचानक उपटल्याचे दाखले आहेत, तर दर वर्षी गणपतीच्या मेळयाच्या दंगलींत घरोघर कवि निर्माण होत असतातच. दुकानाच्या मालाची आकर्षक जाहिरात देतांना कोणाला कवितादेवीच्या मंदिराच्या वळचणीला उभे राहण्याचा प्रसंग येतो, तर निकटतर आप्ताचा 'गृह्यसंस्कार' लिहितेवेळीं कोणाच्या अंगांत कवितादेवी भवानीमातेप्रमाणें संचारलेली आढळून येते.

पण प्रीतिदेवतेनें बगारामाच्या हृदयांत कवित्वाची ज्योत पेटविली व त्याला एका क्षणांत कवि बनविलें. बगारामाचें भाषाविषयक ज्ञान किती असेल याची निराळी कल्पना करून द्यायला नको. विद्यादेवीची त्याला किती तपश्चर्या करावी लागली याची माहिती सांगितली म्हणजे सारें लक्षांत येईल. इतकेंच कशाला ? बगारामानें आपल्या दुकानांत 'ग्रंथ हेच आमचे गुरुं आहेत' असें एक ध्येयवचन शिऱ्याच्या शाईंत बोटें बुचकळून एका पाटीवर लिहिलेलें होतें. त्यांत 'गुरु' शब्दांतील 'रु' वर त्यानें दिलेल्या ठळठळीत अनुस्वारावरून त्याच्या मराठी भाषेच्या ज्ञानाची दुकानाकडे पाहात रस्त्या-वरून जाणाऱ्या माणसाला सहज जातां जातां कल्पना करतां येण्यासारखी होती. बाकी त्या अनुस्वारांत कांहींच अर्थ नव्हता असें नाहीं. पुस्तकांच्या गोठयांत गुराख्याप्रमाणें बसणारी बगारामाची मूर्ति पाहिली म्हणजे त्या अनुस्वाराची साभिप्रायता लक्षांत आली असती.

तथापि, भावनेची एकतानता झाली म्हणजे सामान्य मनुष्य देखील अलौकिक बुद्धिमत्तेचीं कामें करूं शकतो असें कोणीसें म्हटलें आहे; त्याचें

प्रत्यंतर बगारामाच्या बाबतींत तरी पटून आलें. 'क का'ची बाराखडी देखील ज्याला चार दोन चुका केल्याशिवाय लिहितां आली नसती, तो बगाराम अनुप्रासयुक्त वृत्तमय पद्यपंक्ति निर्माण करूं लागला. लग्नाच्या जेवणावळीच्या दिवशीं अचानक प्रकट होणाऱ्या भिकाऱ्यांच्या तांड्याप्रमाणें निरनिराळया कल्पनांच्या टोळया त्याच्या डोक्यांत जमूं लागल्या. आपण पूर्वजन्मीं कवि असलों पाहिजे अशी अधून मधून त्याला शंका येऊं लागली. नाहींतर आजपर्यंत बेपत्ता असलेली शक्ति एकदम अचानक कोठून जागी झाली हें त्याला कळेना.

प्रेमानें झपाटल्यानंतर पहिले आठ दिवस जवळ जवळ तो मूर्च्छितावस्थेंतच होता असें म्हणावयास हरकत नाहीं. त्या मूर्च्छेनेमधून कवितेनें त्याला जागें केलें. वेळीं अवेळीं दुकानाच्या फळीवर बसून स्वकृत कवितेच्या अर्ध्यामुर्ध्या ओळी बडबडतांना तो आतां दिसूं लागला. या पुढचा त्याचा कार्यक्रम म्हणजे दिवसांतून अनेक वेळां 'नंदनवनां'त जाऊन 'पीयूष चहा'चे घोंट घशाखालीं उतरवावयाचे व राहिलासाहिला वेळ सुंद्रीच्या काव्यमय चिंतनांत घालवावयाचा !

अजून सुंद्री त्याच्याशीं एकही शब्द बोलली नव्हती. बगारामालाही तिच्याशीं बोलण्याचें धाडस झालें नव्हतें. सुंद्रीच्या हातून चहाचा कप घेतांना एकदांच तिच्या बोटांचा त्याला स्पर्श झाला होता.

अहाहा ! एकच स्पर्श-एकच ओझरता स्पर्श—

आणि बगारामाच्या हातांतून त्या वेळीं कप निसटून खालीं पडला. पाऊण छटाक पीयूष चहा वायां गेला. बगारामाची मांडी चांगलीच भाजली; पण त्याला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. त्या तोट्याची भरपाई आधींच झाली होती. फुटक्या कपाचे पैसे त्यानें ताबडतोब तात्याबांच्या हातीं आदा करून टाकले हें सांगणें नकोच.

दोघेंही एकमेकांकडे पहात व हंसत. बगाराम किंचित् हंसे; पण सुंद्री फारच हंसल्यासारखी दिसे. बगारामाला भीति वाटे. एकादे वेळीं तात्याबांच्या लक्षांत यावयाची ही गोष्ट ! पण तात्याबा अगदीं बेफिकीर असत. 'इस तन धनकी कौन बढाई !' गाण्यांत ते गुंग असत. बगारामाची बदललेली मुद्रा

व कळा त्यांच्या लक्षांत आली का कोण जाणें; पण सुंद्रीच्या बाबतींत तात्याबा निर्धास्त होते. त्यांना तिची केव्हांच काळजी वाटली नाहीं.

बगारामाची पहिली कविता एक दोन दिवसांतच जन्मास आली. पहिलें फूल-पहिलें मूल आणि तसेंच पहिलें काव्य ! कोणाला दाखवूं आणि कोठें नाचवूं असें त्याला झालें. ‘ सुंदरीची दंतपंक्ति ’ हा त्याच्या काव्याचा विषय होता. बगारामाच्या काव्याचे कोंवळे अंकुर प्रथम फुटतांना सुंद्रीच्या दांतांचा आधार घेऊन वर चढावेत हें साहजिकच होतें.

खून केलेल्या माणसाला ज्याप्रमाणें खुनाच्या जागीं जाण्याची हुक्की येते, तद्वत् ज्या देवतेच्या स्फूर्तीनें आपण आपलें काव्य लिहिलें तें खुद्द तिलाच वाचून दाखवावें अशी बलवत्तर इच्छा बगारामाच्या अंतःकरणांत जागृत झाली. पण हें होणार कसें ? ‘ नंदवना ’ च्या तोंडाशीं अहोरात्र पहारा करीत तो राखणदार बसलेला असतां सुंद्रीला कविता वाचून दाखविण्याची सोनेरी संधि यावयाची कशी ? बगाराम अगदीं निराश होण्याच्या बेतांत आला. त्याला या संकटांतून मार्ग सांपडण्याची आशा दिसेना.

पण ती भाग्याची संधि एके दिवशीं आली; आणि लौकरच आली. संध्याकाळची वेळ होती. कोण जाणे कुठें, पण दुपारपासून तात्याबांचा दुकानांत पत्ता नव्हता. तात्याबांचा गैरहजेरीचा फायदा घेण्याचा बगारामानें दुपारपासून चंग बांधला होता; पण त्याचा धीर होईना. एरव्हीं तात्याबा दुकानांत असतांना बगारामानें ‘ पीयूष चहा ’ साठीं कितीतरी हेलपाटे घातले असते. पण सुंद्री दुकानांत एकटी आहे, या जाणीवेनें बगारामाच्या अंगचा थरकांप उडाला होता. एकट्या स्त्रीशीं बोलण्याचा त्याच्या आयुष्यांतला हा पहिलाच प्रसंग होता. ती आपल्याशीं बोलेल का ? आपल्याला तिच्याशीं बोलण्याचा धीर होईल का ? आपण गोंधळून जाणार नाहीं ना ? आणि कविता म्हणून दाखविण्याचें आपल्याला सुचेल का ? कविता ऐकून सुंद्री रागावणार तर नाहीं ना ? इत्यादि अनेक भीतियुक्त भावनांचा व विचारांचा बगारामाच्या अंतःकरणांत गोंधळ माजला होता.

शेवटीं त्यानें मनाचा हिय्या केला. आजूबाजूला कोणी पहात नाहीं अशी खात्री करून घेऊन तो सरळ दुकानांत शिरला. दुकानांत बराच अंधार पडला

होता. एक रॉकेलचा धुरकट दिवा कोपऱ्यांत ढणढणत होता व त्याच्या शेजारीं बांकावर बसून सुंद्री धुळाक्षरांचें पुस्तक वाचीत बसली होती.

अहाहा ! माझी कविता सुंद्री अशीच वाचील काय ? बगारामाच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

दुकानांत कोणीच गिऱ्हाईक नव्हतें हें सांगण्याची जरुरी नाहीं. धडधडत्य काळजानें व लटपटत्या पावलांनीं बगाराम सुंद्रीच्या शेजारीं गेला. अजून तिला त्याची चाहूल लागली नव्हती. तिचें वाचन पूर्वींप्रमाणेंच चालू होतें.

बगाराम टेबलाचा आधार घेऊन उभा राहिला. त्यानें सुंद्रीच्या अर्धप्रकाशित चेहऱ्याकडे आणि तिच्या चमकणाऱ्या दंतपंक्तीकडे एकवार निरखून पाहिलें.

" सुंद्रे ! " बगारामानें रुद्ध कंठानें शेवटीं हांक मारली.

" अंः ! " हातांतलें पुस्तक खालीं टाकून सुंद्री ताड्कन उभी राहिली. कोठल्या तरी गिरणीचा भोंगा वाजल्याचा आवाज बगारामाच्या कानीं आला. त्याच्या अंगाचा क्षणमात्र थरकांप झाला.

" तुम्हीं होय ? " सुंद्रीनें खर्जाच्या सुरांत विचारलें. तिची विस्फारलेली दंतपंक्ति दिव्याच्या प्रकाशांत अधिकच चमकूं लागली. " मला वाटलें—! " सुंद्री मध्येंच अडखळली.

बगारामाच्या जिवांत जीव आला. त्यानें अधीरतेनें विचारलें, " काय वाटलें तुला सुंद्रे ? "

" मला वाटलें–अं–मला–वाटलें–दुसरें कोणी तरी आले ! " मान ओवाळून सुंद्री म्हणाली व पुन्हां पुस्तक घेऊन खालीं बसली.

" सुंद्रे–सुंद्रे–दुसरे कोण येणार ? सांग–दुसरें कोण येणार ? " बगारामानें सकंप स्वरांत विचारलें.

" दुसरें कोण म्हणजे–वाटेल तितके लोक येतात तेथें ! " सुंद्रीनें वर न पाहतां तोऱ्यांत उत्तर दिलें.

बगाराम क्षणमात्र स्तब्ध बसला. आपल्या मनांतला भाव आतां कोणत्या शब्दांत व्यक्त करावा हें त्याला कळेना. सुंद्रीचा तुटकपणा पाहून त्याला चमत्कारिक वाटलें; पण ती आपल्याशीं बोलली हें काय थोडें झालें ! या विचारानें त्यानें समाधान मानून घेतलें.

बगाराम बराच वेळ उभा राहिला, असें लक्षांत येतांच सुंद्रीनें मान फिरवून कठोर स्वरांत सांगितलें, " आज चहा नाहीं मिळायचा ! दुकानांत आहे कुठें साखर न चहा. बाबा दुपारपासून सामान आणायला गेले आहेत ते येताहेत अजून ! "

फोनोग्राफच्या कर्ण्यांतून येणाऱ्या आवाजाप्रमाणें सुंद्रीच्या दांताआडून निरनिराळे दंत्य व ओष्ठ्य आवाज निघत होते.

" सुंद्रे, मला चहा नको–मी—चहासाठीं आलों नाहीं ! " बगारामाला आपल्या विषयाकडे वळावयाची संधि मिळाली.

" चहा नको ? " सुंद्रीला आश्चर्य वाटलें, " मग काय पाहिजे ! "

बगारामानें आपला श्वास कोंडून धरला. सर्व शक्ति एकवटल्या. करावाच हिय्या—सांगून टाकावें झालें एकदांचें !

सुंद्रे–सुंद्रे—" बगाराम महाराष्ट्र नाटक मंडळीच्या नटांप्रमाणें घसा खरडून बोलूं लागला. " सुंद्रे ! मला चहा नको–साखर नको ! मला कांहीं नको. मला–सुंद्रे–मला तूं पाहिजेस ! " बगारामानें डोळे मिटले व शेजारच्या लोखंडी खुर्चीची पाठ हातांनीं घट्ट आवळून धरिली.

" अं: ! " पुन्हां एकवार सदर्न मराठा रेल्वेची शिटी वाजल्यासारखा आवाज निघाला. सुंद्रीच्या डोक्यांत मुळींच प्रकाश पडला नाहीं. ती आपला दंतमंडित जबडा सपशेल उघडून बगारामाकडे पाहूं लागली.

" सुंद्रे, सुंद्रे–तूं अशी हंसूं नकोस ! तुला कल्पना नाहीं, मला तुझ्याविषयीं काय वाटतें तें ! तें सर्व सांगायला मला आतां वेळही नाहीं–आणि तें सांगतांही पण येणार नाहीं ! " वक्तृत्वोत्तेजक सभेंत पहिल्या प्रथमच बोलणाऱ्या उमेदवाराप्रमाणें बगाराम बोलूं लागला, " सुंद्रे–त्या दिवशीं प्रथम मी तुझ्या हातचा चहा घेतला त्या दिवशीं तूं माझें काळीज हिरावून नेलेंस. अहाहा ! तो दिवस–तो दिवस मी कसा विसरेन ! सुंद्रे–त्या दिवसापासून हा बगाराम तुझा दास झाला ! सुंदरी, ध्यानीं, मनीं आणि स्वप्नीं तुझ्यावांचून मला कांहीं सुचत नाहीं आणि दिसत नाहीं. मला जेवण नको, खाणें नको, पिणें नको–! "

" बगाराम भलतं बोलूं नका ! दिवसांतून आठ वेळां येथें येऊन चहा ढोशीत बसतां आणि म्हणे मला पिणं नको आणि खाणं नको !–" सुंद्री मध्येंच किंकाळली.

" नाहीं–नाहीं. केवळ तुझें दर्शन व्हावें म्हणूनच मी इतका वेळ या ठिकाणीं येतों. तुझ्या हातून मिळणाऱ्या पीयूषानें माझ्या हृदयांतला दाह शांत होतो ! इतर चहाची मला काय पर्वा ? कालच माझा एक मित्र मला फुकट चहा पाजीत होता ! त्याला मी तात्काळ झिडकारलें तें काय उगाच ? " नंतर कांहींतरी आठवल्यासारखें करून बगाराम घाईघाईनें उद्गारला, -' सुंदरी, तूं माझी होशील का ? "

बगाराम थांबला. त्यानें आपल्या मोटारीला एकदम ब्रेक लावला व तो सुंद्रीच्या जबड्याकडे आशेनें पाहूं लागला. या–या सुंद्रीच्या उत्तरावर त्याच्या आयुष्याचें सुख अवलंबून होतें.

" म्हणजे काय ? " सुंद्रीनें चपापून विचारलें.

" म्हणजे–सुंदरी, तुला स्पष्ट शब्दांत सांगतों, रागावूं नकोस—सुंदरी, तूं माझ्याशीं लग्न करशील का ? सांग, सांग लाजूं नकोस ! "

" इश्श् ! "

मे महिन्याच्या उन्हाळ्यांत मुंबईच्या क्वीन्स रोडवर एकाद्या मोटारगाडीची टायर एकदम फुटावी तसा ' इश्श ' शब्द उच्चारतांना सुंद्रीच्या तोंडांतून जोराचा स्फोट झाला. टेबलावर सांठलेल्या धुळीचा भपकारा एकदम वर उडाला. पलीकडचा रॉकेलचा दिवा पटकन् लहान होऊन मालवण्याच्या बेतांत आला. घडवंचीवर ठेवलेल्या फुटक्या कपबशा क्षणमात्र कंपायमान झाल्या.

आजपर्यंत अनेक लज्जाविनम्र मुखांतून ' इश्श ' शब्दाचा उच्चार निघाला असेल ! अनेक कोमल कंठांतून कोकिळेच्या टहुकाराप्रमाणें ' इश्श ' शब्द उमटला गेला असेल ! अनेक स्मितकंपित ओंठांतून ' इश्श 'चा अस्पष्ट संगीतध्वनि निनादित झाला असेल—

पण मगरीच्या मुस्कटाप्रमाणें वर उचललेल्या बत्तीस दांतांच्या जबड्यांतून, वारुळांतून निघणाऱ्या नागिणीच्या फुस्काऱ्यासारखा किंवा एंजिनमधून सुटणाऱ्या वाफेच्या सुस्काऱ्यासारखा बाहेर पडणारा तो पहिलाच ' इश्श ' होता ! 'इश्श' शब्दानें सुंद्रीची लज्जा सूचित होण्याऐवजीं बगारामाला मात्र लज्जित केलें.

" सुंद्रे, अशी लाजूं नकोस. तूं एकदां माझी झालीस म्हणजे पुढा मग हा

बगाराम काय करून दाखवील तें ! मग तुला कशाला या दुकानांत बसावयाची पाळी येईल ! मग आपण भांबुडर्याला घर घेऊं; आणि नव्या पुलावर दररोज संध्याकाळीं हिंडायला जाऊं ! सुंद्रे, दररोज रात्रीं आपण सिनेमाला जात जाऊं ! आर्यन सिनेमांत माझा एक मित्र डोअरकीपर आहे, तो आपल्याला नेहमीं फुकट सोडीत जाईल !"

"आम्हीं मुंबईत एकदां गेलों होतों ना सिनेमाला ! काय पण गंमत होती !" सुंद्री लडिवाळपणानें मुरका मारून मधेंच म्हणाली. सुंद्रीची मुखकळी एकदम खुलल्यासारखी दिसली.

"अजून काय तूं गंमत पाहिली आहेस !" बगाराम जोराजोरानें पुढें बोलूं लागला, "आपण मथुराभुवनांत जाऊन गुलाबजांबू खाऊं, बुधवार बागेंत बसून कुलपीमलाई खाऊं, नव्या पुलावर जाऊन बालमखिरे खाऊं, बंडगार्डनवर जाऊन बुड्डीचे बाल खाऊं ! सुंद्रे, आपण काय काय करूं, तुला कल्पना होणार नाहीं !"

"मग आपण दर शुक्रवारीं काबली घेत जाऊं बरं काय ?" सुंद्रीच्या दांतांतून पाण्याचे पाझर फुटूं लागले, "आणि मग मी तुमच्या दुकानांतील सारीं पुस्तकें ओळीनें रचून ठेवीन आं ?" सुंद्रीनें आपल्या कल्पनासृष्टींत स्वतःच्या डोक्यावर कधींच अक्षता उधळून घेतल्या होत्या.

"बगारामाला स्वर्गाच्या दरवाजाची कडी आंतून कुणीतरी उघडत असल्याचा भास झाला.

"तुमच्या दुकानांत 'पहिलीचें पुस्तक' आहे का हो ?" सुंद्रीनें लाडिकपणें मध्येंच पृच्छा केली.

"पहिलीचेंच काय, वाटेल तें पुस्तक मी तुला देईन. सगळ्या शाळा कॉलेजांतील पुस्तकांची रास मी तुझ्या पायांपाशीं रचून ठेवीन ! एवढेंच काय, लग्न होऊं दे; मग मी तुला हुजूरपागेंत पाठवीन, चतुरशिंगीच्या कॉलेजांत घालीन, येरवड्याच्या कॉलेजांत ठेवीन !" बगाराम शिवाजी मंदिरांतील वक्त्याप्रमाणें ओरडूं लागला. "तुझ्यासाठीं मी काय करणार नाहीं ? तुझ्यासाठीं मी कविता देखील करीन ! आणि हो, केलीच आहे एक कविता ! तुला सांगायचं अजिबात विसरलों. तीच दाखविण्यासाठीं म्हणून मी इथें आलों; पण:मला भान राहिलें नाहीं ! थांब, दाखवतों तुला म्हणून सुंद्रे !

या कवितेंत मी माझे प्राण ओतले आहेत ग ! होती नव्हती तेवढी बुद्धि मीं यांत खर्च केली आहे ग ! ”

“ तुम्हांला ‘ घेउनि ये पंखा । वाळ्याचा ’ हें पद येतें ? आणि–आणि ‘ श्रीमंत पतीची राणी ’ ? ” सुंद्रीनें कौतुकानें विचारलें.

“ छे–छे ! मला त्या गाण्यांशीं काय करायचंय ! आणि त्यांचा संबंध काय ? ” बगाराम जरा चिडून म्हणाला, “ मी तुला माझें स्वतःचें गाणें म्हणून दाखवितों ! मीं स्वतः केलेलें आणि तुझ्यावर रचलेलें ! ऐक तर खरें तूं ! ”

सुंद्रीनें आमटीचा भुरका मारल्यासारखें करून आपली अनुमति दर्शविली.

बगारामानें घसा साफ केला. खिशांतून एक चुरमडलेली चिठी बाहेर काढली व तिच्यावर पेन्सिलीनें खरडलेल्या कांहीं ओळींवर भरकन् नजर टाकून आपल्या काव्यगायनास सुरुवात केली.

**सुंदरि, सुरेख किति तव दांत !**

‘ सुरेख किती तव दांत ’ हा चरण बगारामानें दोनदां घोळवून म्हटला व तो म्हणतांना त्यानें आपल्या हातांचा पंजा सुंद्रीच्या दांतांपुढें पंचारतीप्रमाणें ओवाळला.

**मोजुनि घ्यावे बत्तिस सगळे, एक उणा नच त्यांत !**
**शंख शिंपले आणिक कवड्या यांवर करती मात !**
**चणे, फुटाणे तशा सुपाऱ्या फोडिसि तूं निमिषांत !**
**हंसता वाटे बत्ताशांची सांडतसे बरसात !**
**तोंड मिटवुनी बसति माकडें, हत्तिहि झुरति वनांत !**

तुकारामाचे अभंग आळवून म्हणणाऱ्या वारकऱ्याच्या भाविकतेनें बगाराम प्रत्येक कडवें पुनः पुन्हा आळवून म्हणत होता. मधून मधून तो अर्थाला अनुसरून अंगविक्षेपही करीत होता. मोहरममधल्या ताबूतांप्रमाणें माना डोलवित सुंद्री जागच्या जागीं स्तब्ध बसली होती.

शेवटचें कडवें घोळवून बगाराम पुन्हां ध्रुवपदाकडे वळला होता. हाताचा पंजा पुन्हां त्यानें सुंद्रीच्या दांतांजवळ नेऊन ओवाळावयास सुरवात केली होती.

इतक्यांत मागल्या बाजूनें कोणीतरी आपली मान जोरानें पकडल्याचा

त्याला भास झाला. तोंडांतून अर्धवट बाहेर पडलेला कवितेचा चरण तसाचे तसाच त्याच्या घशांत जिरला.

" काय चावटपणा मांडला आहेस हा ? "

बगारामाच्या डोक्यावर आभाळ गडगडल्यासारखें झालें. त्यानें चोरट्या नजरेनें मागें पाहिलें, तों तात्याबांचा क्रुद्ध चेहरा त्याच्या दृष्टीस पडला ! बगारामानें आपल्या कुलदेवतेचें स्मरण करून डोळे मिटून घेतले.

" बेवकूफ, शरम नाहीं वाटत असला चावटपणा करायला ! हें का दुकान आहे का तमाशा आहे ? " तात्याबा संतापून ओरडले. त्यांनीं बगारामाला जोराची गचांडी मारली. त्याबरोबर तो धडपडत एका खुर्चीवर जाऊन पडला.

मांजरानें कोंबड्याला पकडलें म्हणजे तें जसा आवाज करतें तसा चमत्कारिक आवाज करीत सुंद्रीनें दुकानाच्या आंतल्या बाजूच्या खोलीकडे तडक धांव घेतली. पुढचा प्रकार पहाण्याची तिची ताकदच नव्हती.

बगाराम कसाबसा उठला. त्यानें आपली टोपी डोक्यावर नीट दाबून बसविली. मनाचा धडा करून तात्याबाशीं त्यानें स्पष्ट बोलायचें ठरविलें. मग काय व्हावयाचें असेल तें होवो.

रागानें थरथर कांपणाऱ्या तात्याबाकडे वर न पाहतां बगारामानें हलक्या आवाजांत बोलावयाला सुरवात केली. " तात्याबा, रागावूं नका. मी भलत्या हेतूनें या दुकानांत मुळींच पाय टाकला नाहीं. तात्याबा, मी गेले आठ दिवस तुमचा चहा प्यालों आहें. मी असें कसें करीन ? "

" मग कशाला आला होतास मरायला इथें ? आणि त्या पोरीला गाणें कसलें म्हणून दाखवीत होतास ? तिच्या दातांची थट्टा करीत होतास, होय ! याद राख, दांत पाडून टाकीन तुझे मी, सोडायचा नाहीं ! " तात्याबा हात उगारून ओरडले.

" छे–छे ! " बगाराम कळवळून म्हणाला, " तिच्या दांतांची थट्टा करण्याचें घोर पातक कोण करील ! तात्याबा, तिच्या सुंदर दांतांवर मी कविता रचली आहे—"

" त्या बंबांत घाल तुझी कविता ! म्हणजे बंब पेटवण्याचा आजचा माझा खर्च तरी वाचेल ! तुझें म्हणणें तरी काय आहे ? तुला वेड लागलें आहे कीं काय ? "

" होय, मला वेड लागलें आहे. तात्याबा, तुमच्या मुलीनें मला वेड

लावलें आहे. आतां सरळच विचारतों–रागावूं नका, तात्याबा, सुंद्री माझी पत्नी होण्याचें भाग्य मला लाभेल का ? सुंद्री माझी होईल का ?—"

"अरे चोरा--" बगारामाचें वाक्य पुरें होण्याचे आधींच तात्याबा किंचाळले. "हा तुझा डाव आहे काय ? जुन्या पुस्तकांच्या उकिरड्यावर लोळणाऱ्या गाढवाला माझी मुलगी देण्याइतका मी गधडा नाहीं ! होतोस कीं नाहीं चालता ! का घालूं पाठींत लाथ !—"

बगारामाच्या डोक्यावर वीज कडकडली ! अशनिपात झाला ! त्याच्या आशेचे गगनचुंबित मनोरे जमिनदोस्त झाले ! पुढचे शब्द ऐकायला तो कशाला थांबेल ?

तात्याबा आपला पाय वर उचलण्याचे आधींच बगारामानें दुकानाबाहेर पाय काढला होता.

"ये तर खरा पुन्हां दुकानांत ! कंबरच मोडीन ! चिंध्याविक्या कुठला !" जातां जातां बगारामाच्या कानांवर शब्द पडले.

४

प्रेमाचा मार्ग पुण्यांतल्या रस्त्यासारखा असतो; म्हणजे केव्हांहि कधीं धड नसतो ! उन्हाळ्यांत धुळीनें मळकटलेला, पावसाळ्यांत चिखलानें बरबटलेला आणि हिंवाळ्यांत दुरुस्तीसाठीं उकरलेला ! पुण्याच्या रस्त्यांतून ठेंचाळत जाणारा नवखा तरुण कधीं आपला पाय मोडून घेईल तें कळायचं नाहीं !

बगारामाचें असेंच झालें ! प्रणयाच्या प्रांतांत पहिलें पाऊल टाकल्याबरोबरच आपल्याला लाठीमार खावा लागेल अशी त्याला कल्पना नव्हती ! आठ वेळां परीक्षेंत नापास झाल्याबद्दल त्याला इतकें वाईट वाटलें नसेल किंवा 'बजरंग बुकडेपो' कुणीं लिलावांत काढला असता तरी त्याला इतका धक्का बसला नसता !

त्याला तात्याबाचा असा संताप आला ! काय करूं आणि काय न करूं असें त्याला होऊन गेलें ! चारदोन रॉकेलचे डबे 'नंदनवन विश्रांतिगृहा' वर ओतून, आंतील 'पीयूष चहा'च्या बंबासकट त्याचा भडका उडवून द्यावा असें त्याला वाटलें !

पण त्या आगीच्या खाईत आपली प्रणयदेवता जळून भस्मसात् व्हावयाची के ! नकोच तो विचार ! तात्याबासंबंधीं विचार करतांना द्वेषानें दगडी

कोळशाप्रमाणें धगधगणारें त्याचें मन सुंद्रीविषयीं विचार करतांना बेळगांवी लोण्याप्रमाणें मवाळ होई !

बगाराम तितका निराश झाला नव्हता. अपमानाबद्दलच्या सूडाच्या निखाऱ्यांखालीं त्याच्या आशा तितक्याशा करपलेल्या नव्हत्या ! विमा एजंटाप्रमाणें प्रेमी जीवाचाही आशावाद चिवट असतो. तात्याबांनीं आपला अपमान केला, आपल्याला नकार दिला, पण सुंद्रीनें तर तसें केलें नाहीं ! तिनें आपली कविता आवडीनें ऐकिली ! तिच्या मनांत तर आपल्यासंबंधीं प्रेम आहे--खास खास प्रेम आहे !—तात्याबाशीं आपल्याला काय करायचें आहे ! सुंद्री आपल्याला वश असली म्हणजे मग कशाचीही पर्वा नाहीं !

केवळ सुंद्रीच्या आशेनें तो आतां जगला होता. 'नंदनवनां' तील पीयूष चहाला—सुंद्रीच्या हातून मिळणाऱ्या अमृतमधुर पेयाला तो आतां अंतरला होता ! त्या दुकानांत पाऊल टाकणेंहि त्याला शक्य नव्हतें. आपल्या दुकानांत बसून व दुकानाच्या फळ्या अर्धवट मिटवून उरलेल्या फटींतून तो तासचे तास सुंद्रीच्या लीला अवलोकन करीत बसे ! आणि अवलोकन करण्याजोगत्या सुंद्रीच्या लीलाही पुष्कळच असत. सुंद्रीची जरा पाठ वळली तर त्याचा जीव घाबरा होत असे. सबंध रस्त्याचे मधें अंतर होतें तरी सुंद्रीची सुधाधवल दंतपंक्ति व तिच्याभोंवतीं सदैव खेळणारें हास्य त्याला आपल्या दुकानांतून स्पष्टपणें दिसत असे ! 'सुंदरी, सुरेख किती तव दांत' हें स्वकृत काव्य त्यानें कितीतरी वेळां आळवलें असेल ! सकाळ संध्याकाळ 'विष्णुसहस्रनामां' प्रमाणें त्यानें त्याचीं आवर्तनें चालवलेलीं होतीं ! पण इतक्या लांबून सुंद्रीला हें काव्य-गायन कोठून ऐकायला यावयाला ! रस्त्यावरच्या कर्कश रहदारींत, टांग्यांच्या खडखडींत आणि मोटारींच्या कठोर दंगलींत त्याच्या गायनाचे सूर मधल्या-मधेंच गडप होत होते !

दोनचार दिवस उलटले आणि सुंद्रीच्याबद्दल त्याला वाटणाऱ्या आशेचा आधारही कमकुवतच ठरला ! संकटें येऊं लागलीं म्हणजे एकटीं दुकटीं थोडींच येतात ? प्रेमाच्या सृष्टींत बगारामाला एक प्रतिस्पर्धि अचानक उत्पन्न झाला. सुंद्रीच्या रूपसंपदेवर बहाल होणाऱ्या रसिकांची संख्या आतां दुपटीनें वाढली !

एके दिवशीं दुपारीं 'नंदनवन' विश्रांतिगृहापुढें एक कोरी करकरीत

मोटारगाडी येऊन उभी राहिली. मोटारच्या इंजिनची धडधड एकदम थांबली आणि बगारामाचा प्रतिस्पर्धि मोटारींतून खालीं उतरला. मात्र तो पुढच्या बाजूनें उतरला, मागच्या बाजूच्या दारानें नव्हे. डोक्यावरची बँडवाल्यासारखी थबकडी टोपी त्यानें उचलली व घामानें थबथबलेल्या केसांच्या झिंज्या दुसऱ्या हाताच्या बोटांनीं निपटून काढल्या. विजारीच्या खिशांतून मूळचा खाकी रंगाचा असलेला पण आतां कोठल्याही रंगाच्या कसोटीला न उतरणारा हातरुमालाचा बोळा त्यानें बाहेर काढला व मोटारच्या रोगणाच्या चारदोन फराट्यांनीं रंगलेलें आपलें तोंड पुशीत पुशीत तो दुकानांत चढला. मोटारींतून आलेलें हें तात्याबांचें पहिलेंच गिऱ्हाईक. खुर्चीवरून उठून त्यांनीं त्यांचें स्वागत केलें. मोटारवाली असामी लोहाराच्या भात्यासारखे सुस्कारे टाकीत एका बांकावर बसली आणि तिनें ' एक सिंगल व अख्या पावाची ' घाऊक ऑर्डर दिली.

बाहेर कडकडीत ऊन पडलें होतें. आणि त्या उन्हाच्या झळयांनीं अंग उकडून निघत होतें. सर्वांगांतून घामाच्या धारा लागल्या होत्या. मोटारवाल्या गिऱ्हाइकानें आपली सदऱ्याची गुंडी ढिली केली व पोत्यांत हात घातल्याप्रमाणें वरतून हात घालून अंगाचा घाम पुसून घेतला, तोंच गरम चहाचा कप त्याच्या पुढें आदळला गेला.

त्यानें वर पाहिलें ! आणि एकदम त्याच्या डोळ्यांपुढें हजारों काजवे चमकूं लागले ! त्याला कांहीं दिसेना. चार सेकंदाच्या आंतच त्याचा बगाराम झाला !

त्या दिवशीं संध्याकाळपर्यंत ती मोटार तात्याबांच्या ' नंदनवना ' पुढें उभी होती. संध्याकाळीं तात्याबांनीं दुकानाचा आढावा घेतला तों बंबांत ' पीयूषा ' चा एक थेंबही नव्हता, पावाचा ढीग पार खलास झाला होता— चकल्यांची बरणी फस्त झाली होती आणि तात्याबाच्या पत्र्याच्या पेटींत दोन ओंजळी भरतील एवढा खुर्दा सांठला होता.

त्या दिवसापासून रोज दुपारीं अगदीं ती मोटार तात्याबाच्या दुकानापुढें येऊन उभी राहिलेली बगाराम पाहात असे. आतां सुंद्रीची दंतपंक्ति आपल्या दुकानांच्या दिशेनें वळलेली बगारामाला कधींच दिसून येत नसे. आपल्याकडे पाहून हंसण्याऐवजीं ती आतां दांत विचकते कीं काय असा देखील• त्याला

संशय येऊं लागला! तात्याबांनीं पेटवलेल्या अपमानांच्या आगींत त्या मोटार-वाल्या इसमानें पेट्रोलचा डबाच उपडा केला! बगारामाच्या हृदयांत मत्सराचा सैतान मोहरमच्या वाघाप्रमाणें नाचूं लागला! एकूण स्त्रीजात म्हणजे—!! बगाराम दांत ओठ खाऊन स्वतःशींच बडबडूं लागला.

एके दिवशीं तर सुंद्री त्या मोटारमध्यें बसून गेलेली बगारामानें पाहिली—अगदीं प्रत्यक्ष पाहिली. सुंद्री एक वेळ मोटार गाडीखालीं चिरडली गेली असती तर त्याला वाईट वाटलें नसतें, इतकें दुसऱ्याच्या बरोबर मोटारींत तिला जातांना पाहून आतां त्याला वाईट वाटलें. आतां मात्र त्याच्या संतापाचा कडेलोट झाला! एक वेळ तात्याबाला त्यानें क्षमा केली असती; पण त्या पाजी मोटारवाल्याला—! छेः! शक्यच नाहीं.—कालत्रयीं शक्य नाहीं. शेजारच्या चांभाराची अणकुचीदार आरी घेऊन त्याच्या मोटारच्या रबरी धावांची चाळण करून टाकावी असें त्याला वाटलें. नुसतें वाटलें नाहीं; तर तो उठला आणि चांभाराच्या दुकानांत देखील गेला होता आरी आणायला. तोंच 'समोरच्या तात्याबाच्या पोरीसाठीं तो मोटारवाला कालच चपला उधार घेऊन गेल्याची बातमी' चांभारानें बगारामाच्या कानांत हलकेच सांगितली. बगारामाच्या काळजाचें रागानें थिरडें झालें! या वेळीं त्याच्या समोर, त्याचा प्रतिस्पर्धि मोटारवाला उभा असता तर त्या चांभाराचें सारें दुकान यानें तीन मजल्यावरून त्याच्या टाळक्यावर उपडें केलें असतें.

रागानें-द्वेषानें-मत्सरानें बगारामाची छाती आतां अगदीं फुटावयाच्या बेताला आली. त्याला त्या यातना सहन होईनात. यापेक्षां सुंद्रीला जाऊन प्रत्यक्ष विचारावें—अजून कदाचित् आपलें नशीब उलटेल; नाहीं कुणीं म्हणावें? म्हणजे सोक्ष का मोक्ष तो एकदांचा होऊन जाईल; पण यातनेच्या नरकांत आतां कुजत पडणें नको! असें बगारामाला वाटलें.

त्या दिवशीं तात्याबा शेजारच्या दुकानांत विडी ओढायला म्हणून गेले असतांना, बगाराम तीराच्या वेगानें त्यांच्या दुकानांत शिरला. बगारामाचा प्रतिस्पर्धीही दुकानांत दिसत नव्हता! इतक्या दिवसांनीं आपण दुकानांत जातों आहोंत—सुंद्री आपलें हंसऱ्या चेहऱ्यानें स्वागत करील—पहिलीचें पुस्तक तुमच्या दुकानांत आहे का—म्हणून लाजून विचारील—

पण छेः, बगारामाच्या या आशा व्यर्थ ठरल्या. जाफराबादी म्हशीच्या मारकट मुद्रेनें सुंद्रीनें बगारामाला न्याहाळलें व दांत विचकल्यासारखें केलें !

" सुंद्रे, सुंद्रे—" विषमज्वराच्या दुखणाइताप्रमाणें बगाराम विव्हळला.

" बगाराम, तुम्ही माझ्याशीं बोलूं नका !" दांताचा पिंजरा एकदम गपकन् मिटून सुंद्री म्हणाली.

" सुंद्रे, इतकी कठोर होऊं नकोस ! इतक्यांतच तो दिवस विसरलीस अं ! सुंद्रे, मी तुला पहिलीचीं चार पुस्तकें देईन ! शुक्रवारची काबली देईन !" बगारामाचा गळा दाटून आला होता.

" मला नको जा तुमची ती काबली ! आम्हीं परवां आंब्याचें आइसक्रीम खाल्लं " सुंदरी जिभल्या चाटीत म्हणाली.

" सुंद्रे, मी तुला आंब्याचं आइसक्रीम देईन, फणसाचं देईन, टरबुजाचं देईन ! पण तूं असं मला झिडकारूं नकोस ! त्या थापाड्या मोटारवाल्याच्या नादानें तूं अशी बहकूं नकोस ! "

" खबरदार अं, आमच्या बबनरावांना कांहीं भलतं सलतं म्हणाल तर !" सुंदरी गाल फुरगटून ओरडली.

" अस्स ! बबन काय त्याचं नांव ? " निराशेच्या कठोरतेनें बगाराम उद्गारला, " माझ्यापेक्षां तुला त्या बबन्याची किंमत अधिक वाटते काय ? मालकाच्या मोटारींतून परभारें मजा मारणाऱ्या त्या मोटारहांक्याची मला मिजास सांगूं नकोस ! कुठें एकदां मोटारींतून तुला चक्कर मारून आणलें तर बबन्याचा बबनराव झाला काय ! "

" नसली मोटारगाडी त्यांची म्हणून काय झालें ! मोटारींत तर आम्हांला बसायला मिळतें ! तुमच्या दुकानांत काय कागदाच्या पत्रावळी टांचीत बसायचें ? " कोंपऱ्यांत सांपडलेल्या मांजरीप्रमाणें गुरगुरत सुंदरी बोलली. बाजाच्या पेटीच्या भात्याप्रमाणें तिचे ओंठ मागेंपुढें हलत होते.

सुंदरीचे शब्द करवतीप्रमाणें बगारामाचें काळीज कापीत गेले. बगारामाच्या हृदयांत उरलेला शेवटचा आशातंतु तुटला. स्वतःच्या धंद्याची इतकी निर्दय थट्टा सुंदरी करील अशी त्याला स्वप्नांत देखील कल्पना नव्हती. बस्स ! आटोपला आपला प्रेमग्रंथ ! संपला सुंदरीचा नि आपला ऋणानुबंध !

" सुंद्रे ! निष्ठुर मुली ! काय बोललीस तूं हें ? " बगाराम निर्जीवपणें बोलूं लागला. " इतका का माझा तुला तिटकारा वाटूं लागला ? सुन्द्रे, मला आधीं सांगितलें असतेंस तर मी कशाला आशेचे मनोरे बांधले असते ? त्या मोटारवाल्यानें काय तुझ्यावर मोहिनी टाकली आहे कांहीं कळत नाहीं ! वेडे पोरी, सोडून दे त्या माणसाचा नाद ! पुन्हां सांगतों, फसशील बरें. चल–एक सोडून छप्पन मोटारी देईन मी तुला ! शनवारवाड्यापुढें किती तरी उभ्या असतात ! चल—" बगारामानें चटूकन् सुंद्रीचा हात धरला.

हातावर झुरळ चढल्याप्रमाणें सुंद्रीनें एकदम हात झाडला व बाजाच्या पेटीच्या चार पट्टया एकदम दाबाव्यात तशा स्वरांत ती ओरडली, " होतां कीं नाहीं दूर तुम्ही ! मी बाबांना सांगेन अं ! मी बबनरावांना हांक मारीन ! "

आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या नांवाचा उच्चार होतांच बगारामाच्या द्वेषाच्या ज्वाला एकदम भडकून उठल्या.

" जा–जा ! त्या थेरड्याला हांक मार नाहीं तर त्या बबन्याला बोलाव ! " बगाराम चवताळून म्हणाला. " म्हणे मी बबनरावाला हांक मारतें ? वा रे वा, बबनराव ! शिमग्याच्या सोंगासारखी त्याची ती साहेबी टोपी काय न् मोटारच्या वंगणानें बरबटलेले त्याचे हात काय ! आणि गुडघ्यावर फाटलेलें विजारीचें पोतें काय ! उडाणटप्पू हंडीबाग कुठला ! हाः हाः हाः ! " बगाराम मोठमोठ्यानें स्वतःशींच हंसूं लागला.

" हाः ! हाः ! हाः ! " बगारामाच्या पाठीमागून विकट हास्याची गर्जना झाली. तो मागें वळून पहातो–तों हाताच्या बाह्या मागें सारून डोळे गरगर फिरवीत अंगावर धांवून येत असलेला त्याचा प्रतिस्पर्धी सुंद्रीचा नवा दोस्त–बबनराव–!

बगाराम मटकन् खालींच बसला !

" उडाणटप्पू हंडीबाग काय ! शिमग्याचें सोंग ! विजारीचें पोतें ! " उतारावरून धांवणाऱ्या फोर्ड गाडीप्रमाणें बबन गडगडला, " पाजी माणसा, माझी बदनामी करतोस ! जरीपुराण्या कुठला ! तुझ्या दुकानांतल्या पुस्तकांचें सरण रचून तुला जिवंत भाजून काढीन ! काय समजलास ? रद्दी विकून पोट जाळणारा कंगाल ! मला नांवें ठेवतोस ? " बबननें आपल्या पोलादी पंजाची पकड बगारामाच्या गळ्याभोंवतीं घातली !

कोंडणपूरच्या जत्रेंत कापायला काढलेल्या मेंढराप्रमाणें बगाराम किंचाळला! त्याबरोबर बबनला काय वाटलें कोणास ठाऊक! घराबाहेर टाकण्यासाठीं एकादें मरतुकडें मांजर उचलावें त्याप्रमाणें त्यानें बगारामाला मान पकडून वर उचललें आणि अलगपणें दुकानाच्या फळीबाहेर नेऊन सोडलें.

पिंजऱ्यांतून सुटलेल्या उंदराप्रमाणें बगारामानें आपल्या बिळाकडे धांव घेतली. त्यानें मागें वळून देखील पाहिलें नाहीं.

पाठीमागून कुणी चिखलाचे गोळे मारावेत तशी सुंद्रीच्या व बबनच्या दुय्यम हास्याची तानबाजी त्याच्या कानावर येऊन आदळली!

५

प्रत्येक माणसाच्या आयुष्यांत आत्महत्त्या करण्याचा प्रसंग एकदां तरी येतोच असें कोणीसें म्हटलें आहे तसा प्रसंग बगारामाच्या आयुष्यांत आतां उपस्थित झाला होता. आतां या जगांत जगण्यासारखें बगारामाला काय राहिलें होतें? कुणाकडे पाहून आणि कशासाठीं त्यानें आतां हें कंटाळवाणें जिणें कंठावयाचें? प्रेमाच्या सृष्टींत निराशेचा आणि अपमानाचा वांटा त्याच्या नशिबाला आला होता! एक वेळ प्रियतमेच्या नकाराचें जहर त्यानें पचविलें असतें! पण आपल्या डोळ्यांदेखत आपल्या प्रतिस्पर्ध्याचा विजय! असली अपमानाची काळोखी तोंडाला लावून हयात कंठण्यापेक्षां जगांतून कायमचें नाहींसें झालेलें काय वाईट!

बस्स! आत्महत्त्या करण्याचा बगारामाचा निश्चय ठरला! अगदीं ठाम निश्चय ठरला! निरोप घेण्यासारखे त्याला जवळचे कोणीच आप्त नव्हते. त्याच रात्रीं त्यानें खाणावळीचें बिल चुकतें केलें. 'बजरंग बुकडेपो' च्या फळ्या लावून कुलूप ठोकलें व त्याची किल्ली शेजारच्या चांभाराजवळ दिली. महिनाभर गांवाला जाऊन येतों असें त्याला त्यानें सांगितलें. 'तात्याबाच्या पोरी' संबंधीं चांभार बगारामाच्या कानांत कुजबुजण्याच्या आधींच तो दुकानाबाहेर पडला आणि समोर वाट दिसेल तिकडे चालूं लागला.

पण जायचें कुठें? जीव द्यायचा झाला तरी जायचें कुठें? पुण्यांत फिरावयास जावयाला आणि जीव द्यावयाला एक सोयीची जागा असेल तर शपथ! जिथें जावें तिथें लोकांची रहदारी आणि गर्दी. एकांतवास मिळण्याचें

नांवच नको. जन्मास येतेवेळची सुखसोय करण्याकडे पुण्यांतल्या बऱ्याच लोकांचें लक्ष असेल; पण सुखाच्या मरणाची सोय करण्याकडे देखील लक्ष नाहीं! पुणें शहरांतल्या या भयंकर गैरसोयीची बगारामाला आजपर्यंत कल्पना नव्हती! आतां तें त्याच्या लक्षांत आलें!

लकडीपुलाकडे जावें–पण नको! तिथें त्या पेन्शनरांचा थवा बसलेला असावयाचा! दुःखाचें जिणें पत्करलें; पण मरतेवेळीं पेन्शनरांचें दर्शन नको! कुठें चालला म्हणून नसती चौकशी करून हातीं घेतलेल्या कामांत खो घालावयाचे! पर्वतीच्या तळ्याकडे मोर्चा वळवावा तर जीव द्यावयाला पाण्याचें एक टिपूस त्यांत असेल तर शपथ! उलट साऱ्या गांवचा कचरा नाकातोंडांत मात्र शिरावयाचा आणि पत्र्याच्या तुकड्यांनीं अंग खरचटायचें! पर्वतीवरच्या टेंकडीवर जावें तर शरीरप्रकृति सुधारण्याच्या फाजील कल्पनेनें बहकलेले नवजवान जागोजाग पोस्टाच्या पेटीसारखीं तोंडें उघडून हवा खात बसलेले असावयाचे! नव्या पुलावर जावें तर—

पण विचाराच्या धुंदींत बगाराम नव्या पुलावरच येऊन पोहोंचला होता. आतां चांगलाच अंधार पडला होता, तथापि नव्या पुलाच्या कठड्यावर बसलेल्या कावळ्यांचा गोंगाट अद्याप कमी झाला नव्हता. लोकांची ये-जा सारखी चालू होतीच. पण बाहेरच्या जगाची बगारामाला कोठून जाणीव असणार? तो आपल्या धुंदींत चाललाच होता. इतक्यांत भली मोठी एक मोटार लॉरी समोरून वेगांत आली. थोडक्यांत चुकलें–नाहींतर त्या मोटारखालीं सांपडून बगारामाच्या चिंधड्या उडाल्या असत्या. टुणूकन् उडी मारून तो बाजूला झाला व त्यानें त्या मोटारगाडीच्या ड्रायव्हरला जोराची शिवी हांसडली.

"ड्रायव्हर आहे का हैवान आहे? लोकांना ठार मारतो कीं काय!"

मागें पाहून रागानें पुटपुटत तो पुढें चालूं लागला. क्षणभरानें त्याला स्वतःचेंच हंसूं आलें. अरे, आपण आत्महत्त्या करायला निघालों ना? मग प्राणाची इतकी जपणूक कशाला? चांगलें आपलें आयतें काम झालें होतें! विनाकारण त्या ड्रायव्हरला कां शिव्या?

चालतां चालतां तो एकदम थांबला. त्याच्या डोक्यांत कसला तरी प्रकाश पडला. बस्स! मोटारखालींच जीव द्यायचा! म्हणजे त्रास नको न् खटपट

नको. कधीं प्राण गेला तें कळायचें देखील नाहीं ! अहाहा ! पुण्यांत सरावैरा धांवणाऱ्या या मोटारगाड्या म्हणजे माझ्यासारख्या दुःखी जीवांना केवढातरी आधार आहे ? पृथ्वीवरच्या प्रवासापेक्षां मृत्युलोकाच्या प्रवासाची या गाड्यांनीं केवढी तरी सोय करून ठेविली आहे ! एक वेळ यांच्या रबरी धांवा हवाफस्त होऊन पृथ्वीवरचा प्रवास अडून बसायचा; पण मृत्युलोकच्या प्रवासांत यांच्याकडून अशी अडचण येण्याची मुळीं भीतीच नको.

बगाराम झपझप पावलें टाकीत पूल ओलांडून पलीकडे गेला. त्या बाजूला माणसांची रहदारी जवळ जवळ नव्हती म्हटली तरी चालेल. आणि रस्ताही चांगला ऐसपैस रुंद होता. भोंवतालीं गडद काळोख होता. हवाखात्याच्या इमारतीवरील मनोऱ्यांतील घड्याळांत साडे अकरा वाजून गेले होते.

बगाराम रस्त्याच्या कडेला असलेल्या एका दगडावर बसला आणि आळंदीला जाणाऱ्या उतारूंप्रमाणेंच जणूं काय तो मोटारीची मार्गप्रतीक्षा करूं लागला. स्वर्गाच्या वाटेवर इतक्या शांतपणें आजपर्यंत कोणीही मर्त्य प्रवासी बसला नसेल. बाहेरच्या काळोखाप्रमाणेंच बगारामाच्या डोक्यांतही अगदीं काळोख पसरला होता. त्याच्यांत विचाराची एवढीसुद्धां हाल-चाल नव्हती.

लांबून मोटारीच्या शिंगाचा दीर्घ ध्वनि निनादित झाला. झगझगत्या दिव्याच्या तेजस्वी किरणांचे दोन झोत दुरून परावर्तित होऊं लागले. वेगानें फिरणाऱ्या चाकांची व जोरानें चालणाऱ्या इंजिनची अस्पष्ट धडधड अधिकाधिक स्पष्टपणें कानीं येऊं लागली. आली—अखेर शेवटीं बगारामाच्या मृत्यूची मेलगाडी आली.

तो चट्कन् उभा राहिला. कमरेचें धोतर त्यानें नीट आंवळून बांधलें. रस्त्याच्या मधोमध जाऊन त्यानें आपल्या अंगांतला कोट काढला व नीट खालीं अंथरला. उशाखालीं टोपी घेऊन तो एकदम लवंडला आणि पोटाशीं पाय मुडपून व डोळ्यांवर घट्ट हात दाबून धरून तो निपचित पडला. आतां एक निमिषाचाही अवकाश नव्हता !

संतापलेल्या कुत्र्याप्रमाणें जोराचा भुभूःकार करीत मोटारगाडी धांवत आली. दिव्याचा प्रकाश एकदम बगारामाच्या अंगावर पडला. बगारामानें सर्वांग घट्ट आवळून घेतलें. आतां गाडी अंगावरून जाणार तोंच, मोटार-

गाडीच्या पुढच्या बाजूकडून अचकट विचकट शिव्यांची फैर झडली. मोटारच्या चाकांना ब्रेग कडकडून डसल्याचा आवाज झाला आणि गाडी किंचाळून खाडकन् उभी राहिली ! उभी राहतांना तिचा मागचा भाग दोन फूट वर उडून खालीं आदळला !

मोटार थांबतांच आंतून दोन व्यक्ती बाहेर आल्या व त्यांनीं जवळ येऊन बगारामाला नीट न्याहाळलें आणि दंडाला धरून खूप हालविलें; पण तो अगदीं मृतवत् पडला होता. त्यानें हूं का चूं केलें नाहीं किंवा तोंडावर दाबून ठेवलेले हातही दूर केले नाहींत. त्या दोन व्यक्ती एकमेकींशीं कांहीं तरी पुटपुटल्या व त्यांनीं बगारामाला अलगपणें उचलून मोटारींत घातलें.

मेल्यानंतरची आपली स्मशानाकडे यात्रा चालली असल्याचा बगारामाला भास होत होता.

बगारामाचा लोळागोळा घेऊन मोटार पूर्वीच्या वेगानें चालती झाली.

६

कोरेगांव रस्त्यावरील एका सुंदर बंगल्यामधील शृंगारलेल्या दालनांत मच्छरदाणीनें अवगुंठिलेल्या एका पितळी पलंगावर उबदार ब्लँकेटांत गुंडाळलेलें एक गाठोडें पडलेलें होतें. सकाळचे चांगले आठ वाजून गेले असतील. सूर्याचीं पिंवळींधमक उन्हें बंगल्याबाहेरच्या बागेंतील रंगीबेरंगी फुलझाडांवर खेळूं लागलीं होतीं. त्या उन्हांचा कवडसा त्या खिडकीच्या जाळयांतून त्या पलंगाच्या एका कोपऱ्यावर पडलेला होता. थोड्या वेळानें त्या गाठोड्यांत हालचाल सुरू झाल्याचीं चिन्हें मच्छरदाणीच्या जाळींतून दिसूं लागलीं. कांहीं वेळानें गांठोड्यांच्या एका बाजूनें एक माणसाचा पाय बाहेर आला व दुसऱ्या बाजूनें हातांचीं बोटें हळुहळू वर येतांना दिसूं लागलीं. अरबी भाषेंतल्या चमत्कारिक गोष्टींत वर्णन केलेल्या रॉक पक्ष्याच्या अंड्यांतून नुकतेंच पिलूं बाहेर पडतांना जसा देखावा दिसला असता तसें तें दृश्य दिसत होतें. दोनचार मिनिटांचे आंतच त्या ब्लँकेटचा एक पदर उचलला गेला व आंतून दोन डोळे चमकतांना दिसूं लागले.

इतक्यांत बाहेरून कोठून सदर्न मराठा रेल्वेच्या इंजिनचा चौपदरी सूर वातावरणांत उठला !

ब्लँकेट विद्युल्लतेच्या वेगानें वरचेवर फेंकलें गेलें व आधीं प्रगट झालेल्या हातापायांचा अदृश्य असलेला मालक बगारामाच्या रूपानें त्या पलंगाच्या मधोमध कचकड्याच्या बाहुलीच्या पवित्र्यांत बसलेला दृष्टीस पडला.

काय ! स्वर्गात देखील सदर्नमराठा रेल्वे आहे ? हायरे, कमनशीब ! आधीं मला हें कळतें तर जीव देण्याच्या भानगडींत मी कशाला पडलों असतों ? परमेश्वरा, तुझ्या राज्यांत तूं अद्यापि सर्व आगगाड्या सरकारी कां केल्या नाहींस रे ?

बगारामानें डोळे चोळले व पाण्यांत पोहून आल्यानंतर कुत्रें जसें अंग झाडतें तसें त्यानें अंग झाडलें. हळुहळू तो पलंगाच्या कडेला सरकत आला व मच्छरदाणीच्या जाळीदार पडद्यांतून डोकें बाहेर काढून आजूबाजूला पाहूं लागला.

खास स्वर्गच हा ! संगमवरी दगडांची गुळगुळीत फरशी, नयनमनोहर रंगाच्या वेलबुट्टयांनीं भूषविलेल्या भिंती, रुंद सोनेरी चौकटीचीं त्यावर टांगलेलीं सुंदर चित्रें, केशरी मखमालीच्या गुबगुबीत गिर्द्यांनीं मढविलेल्या खुर्च्या आणि कोंचें, चकचकणाऱ्या मेजावर ठेवलेलीं रौप्य पुष्पपात्रें आणि पांढरे शुभ्र अर्धपुतळे—स्वर्ग, स्वर्ग तो यापेक्षां दुसरा कोणता असणार ? आणि ज्याअर्थी आपल्याला हा पाहण्याचें भाग्य लाभत आहे त्याअर्थी आपण खास मेलों असलों पाहिजे यांत शंका नाहीं ! कारण मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं अशी मराठी भाषेंत म्हण असल्याचें बगारामाला आठवल्या-सारखें वाटलें. आणि त्याबरोबर अजूनही आपल्याला मराठी येत असल्याचें त्याला आश्चर्य वाटलें.

आणि स्वर्गात इतकें सौंदर्य भरलेलें असतांना त्या अभद्र सदर्न मराठा रेल्वेचा फांटा त्या ठिकाणीं परमेश्वरानें कशाला काढावा ? पण जाऊं द्या— ज्याला चंद्रावर सांठलेल्या धुरळयावर फडकें मारावयाला युगें न युगें वेळ मिळाला नाहीं, त्या परमेश्वराचें लक्ष गंजलेल्या जुनाट आगगाड्यांकडे कोठून जाणार ? कांहीं असो; पण आतां या ठिकाणीं निदान कंगाल तात्याबाचा सुरकुतलेला चेहरा पाहण्याची तरी रोज सकाळीं आपत्ति ओढवायची नाहीं ! आपल्या डोळयांदेखत आपल्या हातांतलें सावज झडपून नेणारा तो कसाई काळजाचा धटिंगण—तो फाटक्या विजारीचा भरेकरी तो बबन्या तर या

ठिकाणीं दृष्टीस पडायचा नाहीं ! याच्यापेक्षां सुखाची सीमा ती अधिक कोणती असावयाची ?

असल्या सुखाच्या सृष्टींत आपणाला इतक्या लवकर आणून टाकणाऱ्या त्या कालच्या मोटारवानाचे आपल्याला आभार मानावयाला देखील वेळ मिळाला नाहीं ! येथूनच त्याला आपले आभार पोहोंचते करावेत म्हणजे झालें. अशा विचारानें बगाराम श्राद्धाच्या ब्राह्मणांसारखा स्वत:शींच कांहींतरी पुटपुटला आणि ही कृतज्ञतेची पावती त्या अज्ञात उपकर्त्याला तूं कशी तरी पोहोंचीव अशी त्यानें परमेश्वराची मनांतल्या मनांत प्रार्थना केली.

आदल्या रात्रीपासून बगारामाच्या पोटांत अन्नाचा एक कणही गेला नव्हता. स्वर्गाच्या प्रवासास निघण्याच्या गडबडींत चार दोन घांस पोटांत टाकण्याचेंही तो विसरून गेला. बरोबर फराळाचेंही सामान बांधून घेणें शक्य नव्हतें. पोटाला इतक्या वेळपर्यंत बसलेला ताण त्याला आतां जाणवूं लागला. स्वर्गांत देखील पोटाची कटकट पाठीमागें असतेच तर एकूण ! आपले सुकलेले ओंठ चाटीत बगाराम आजूबाजूला पाहूं लागला तोंच एकदम त्या दालनाचें दार हळूच उघडलें गेलें व आंत एक काळया कुळकुळीत अंगाचा, गुडघ्यापर्यंत सांवरलेलें पांढरें धोतर चांदीच्या दुपदरी करगोटयानें कमरेवर आंवळून घेतलेला, डोक्यावर ऐसपैस घेरा असलेला आणि एका कानांत पितळेची बाळी अडकविलेला एक बाल्या आंत आला.

बगाराम ताड्कन् उठून उभा राहिला ! स्वर्गाच्या या सुखमय सृष्टींत हा पाताळचा रहिवासी कोठून शिरला ? कोणत्या खटाऱ्याखालीं यांनीं आपल्या देहाची विल्हेवाट लावून येथें येण्याची व्यवस्था केली ?

"उठलांव काय दादा ?" बाल्यानें हंसून अदबीनें विचारलें.

बगारामानें आपल्या अंगाला कडकडून चिमटा घेतला. कानांत बोटें खुपसलीं. हा स्वर्ग आहे का हें स्वप्न आहे ?

"झोंप आली ना दादा चांगली ?" बाल्यानें पूर्वीच्या स्वरांतच विचारलें.

मेल्यानंतर कसली झोंप ? मरण हीच काळझोंप नाहीं का ? हातपाय ताणावून कायमचें घोरत पडावयाचें हीच बगारामाची मरणासंबंधींची कल्पना होती. असें असतां राखणदाराची नजर चुकवून स्वर्गांत शिरलेला हा भुरटा प्राणी भलतेंच काय विचारतो आहे ?

" बोला ना दादा, असां काय करतांव् ? घाबरूं नको ! बिवायचं कारण नाय् ! मोठ्या लोकांच्या घरला येऊन पडलाय् तुमी ! " बाल्या आश्वासक स्वरांत म्हणाला.

बाल्या काय बोलत होता त्याचा बगारामाला मुळींच बोध झाला नाहीं. त्याचें डोकें सुन्न झालें होतें. त्याच्या डोळ्यांपुढून जणुं काय ढगांची मिरवणूक चालली होती.

" कोण तूं ? " अपेंडिसायटिसच्या ऑपरेशनमधून प्रथमच जाग्या झालेल्या दुखणाइताच्या क्षीणस्वरानें बगारामानें अखेर शेवटीं विचारलें.

" मी बाल्या नवं कां वालजीसेठचा ! " बाल्यानें हंसून सांगितलें.

" वालजीशेठ ! कोण वालजीशेठ ? आणि मी कुठं आहें ! " बगाराम घाबरून आजूबाजूला पाहूं लागला.

" तुम्ही वालजीसेठाच्या बंगल्यांत हांव ना दादा ! ऐसं काय करतांव् ? पुन्यामंदीच हांयसा. तुम्ही कालजी करता नाय् ! "

" काय पुण्यांतच आहे मी अजून ! स्वर्गांत नाहीं ! स्वर्गांत नाहीं मी ! हायरे नशिबा ! एकूण ती मोटारगाडी स्वर्गांत जाणारी नव्हती—पुण्यांतच येणारी होती ! " रस्ता चुकल्याची जाणीव होतांच एकादें पांच वर्षांचें पोर रडका चेहरा करून जसें केविलवाण्या नजरेनें बघूं लागतें तसा बगाराम त्या बाल्याकडे बघूं लागला. " एकूण मी पुण्यांतच आहें तर ! "

कपाळावर हात मारून बगाराम मट्कन् खालच्या फरशीवर बसला ! त्याच्या डोळ्यांपुढें उकरलेले रस्ते, अंधारे बोळ, धुरकटलेलीं घरें, कचऱ्याच्या पेट्या, एकाद्या पवनचक्कीच्या पात्याप्रमाणें गरगर फिरूं लागल्या. मोटार-गाड्यांच्या पोटांतून तांगे, सायकली व म्हशी चालल्याचें दृश्य त्याला दिसूं लागलें. दुःखातिशयानें गदगदलेल्या माणसाप्रमाणें दोन्ही हातांनीं डोकें दाबून धेऊन आणि डोळे घट्ट मिटून तो रडूं लागला ! पुन्हा दिसणार तो अभद्र तात्याबा—आणि त्याचा तो चहाचा बंब आणि पत्र्याची पेटी हांकणारा तो बोकड बबन्या ! पुन्हा उघडणें आलें बजरंग बुकडेपो ! छेः ! आपल्या नशिबीं कुठला असणार स्वर्ग ! इतकें पुण्य कुठलें असणार आपल्या संचयीं ? शाळेमधल्या अजाण व निष्पाप अर्भकांना एक आण्याचें पुस्तक अकरा आण्यांला विकून त्यावर मिळविलेल्या नफ्याच्या पैशानें आपण पापाचे रांजण

भरले आहेत त्या वाल्या कोळयासारखे ! एवढे मोठे रांजण पाठीशीं बांधून स्वर्गापर्यंत कसें चढतां येणार ? त्या पापाचें प्रायश्चित्त आपणाला अशा रीतीनें भोगायलाच पाहिजे !

" रडतोस कशांयस् दादा ! तुमचें काय वाईट झायलं नाय् ! " बाल्या बगारामाची समजूत घालूं लागला.

दयेचें अपील फेटाळलें गेल्यानंतर मरणाला तयार झालेल्या फांशीच्या कैद्याप्रमाणें दीर्घ सुस्कारा टाकून बगाराम निराशेच्या बेपर्वाईनें उठून उभा राहिला. बाल्यानें त्याला आपल्या हाताचा आधार दिला.

" देवांनीं तुमाला दिस दावला हा बरं दादा ! नाय् तर मोटारखालीं कुत्र्या-वानी चिरडून मरून ग्येला असतां ! " वेडेंवांकडें तोंड करून बाल्या बोलला.

" मेलों असतों तर फार–फार बरें झालें असतें ! " हॅम्लेटच्या आत्मगत भाषणाच्या चालीवर बगाराम स्वतःशींच पुटपुटला.

" असं काय बोलतांव वेडयागत ! चला, जगला वांचला ! चांगलं आपल्या बायकाप्वोरांत जाऊन पडाल ! "

" नाहीं रे, बायकापोरें असतीं तर कशाला गेलों असतों जीव द्यावयाला ! " बगाराम विषण्णपणें म्हणाला.

" जीव द्यायला म्हणून रस्त्यावर परला व्हतां तुमी ? " बाल्याचे बटबटीत डोळे आश्चर्यानें एकदम रुंदावले, " रस्त्यावर झोंपला नव्हता तुमी ? "

बरगडींत कुणी भाल्याचें टोंक डिंवचावें तशी बगारामाच्या अंगांत चमक उठली.

" कोण म्हणतो मी रस्त्यावर झोंपलों होतों म्हणून ? " बगारामानें रागावून विचारलें, " रस्त्यावर झोंपायला मी काय इतका भिकारी आहें ?

" सेठ बोलत व्हता सकालीं आज शेठाणीला तवां म्या ऐकलां, कीं तुमी भर रस्त्यामंदी हातपाय पसरून झोंपला व्हता काल रातीं ! "

" साफ चूक आहे त्यांची ही समजूत ! " बगाराम एकदम खवळून म्हणाला. " वा ! म्हणजे मी चांगला जीव द्यायला रस्त्यांत पडलों होतों; आणि म्हणे रस्त्यावर झोंपलों होतों हातपाय पसरून ! "

आपण जीव तोडून इतकी मरायची खटपट केली आणि लोकांचा असा गैरसमज व्हावा म्हणजे काय ? यापेक्षां अपमान तो कोणता ? बगारामाच्या

नाकाचा शेंडा अगदीं लाल होऊन गेला होता.

" जाऊं द्या त्यें दादा ! तुमी आपलं चाय् प्यायला चला ! शेठ मगापून वाट पहातायंत तुमची ! "

चहाचें नांव कानीं पडतांच बगारामाचा राग एकदम थंड झाला. त्याच्या पोटांत आतां भुकेचें चांगलेंच काहूर माजलें होतें. बाल्याच्या मागून तो मुकाट्यानें चालूं लागला.

" पण दादा, इक्ते जिवास का कंटाळला ? " बाल्या मधेंच थांबला आणि बगारामाकडे वळून त्यानें विचारलें.

" तुझें लग्न झालें आहे ? बगारामानें गंभीरपणें उलट विचारलें.

बाल्या पाठ घुसळून खुदकन् हंसला. जणुं काय त्याच्या पाठीला कुणी गुदगुदल्या केल्या ! " नाय् दादा ! अजून नाय् ! " आणि क्षणभर घोटाळून पुढें म्हणाला, " ठरीवलंय् ! "

" ठरलंय ना ? हरकत नाहीं ! मग आतां मला सांग, तुझी पोरगी दुसऱ्या एकाद्या माणसाच्या नादानें बहकली आणि तुला पार विसरून गेली तर तूं काय करशील ? " बगारामानें बाल्याच्या पुढें गंभीर प्रश्न टाकला.

" काय करीन मी म्हणतांव् ? " बाल्यानें डोळे रोखून कठोर स्वरांत विचारलें, " तिच्या नाकावर टिचून दुसरी आणीन ! सोडायचा नाय् ! बायकोची पत्रास काय ? " बगारामाचा अवघड प्रश्न चुटकीसरशीं बाल्यानें सोडवला.

बगारामाच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला. प्रेमनिराशेचा प्रश्न इतक्या सोप्या रीतीनें सोडवितां येतो याची त्याला कल्पना नव्हती !

या बाल्यानें आपल्याला अजबच उपाय सुचविला ! एकीच्या नाकावर टिचून दुसरी आणायची ! इतकी सोपी युक्ति ! हात्तिच्या ! मग सुंद्रीच्या दांताला काय हिरेमाणकें चिकटलीं आहेत ! तिच्यापेक्षां सवाई दांतांच्या दुसऱ्या पोरी मिळतील ! बगारामाच्या डोळ्यांपुढून मुलींची शाळा सुटल्यासारखे पोरींचे घोळके सरकूं लागले ! इतक्या क्षुल्लक गोष्टीसाठीं का आपण जीव देणार होतों ! किती मूर्खपणा ! जीव देण्याची आठवण होतांच बगारामाच्या अंगाचा थरकांप झाला ! नको ती आठवण ! नशिबाचा आधार म्हणूनच आपण वांचलों ! मनांतल्या मनांत त्यानें वालजीशेठना शतशः दुवा दिला.

"उगाच नाय!" पलीकडच्या खोलींत जातां जातां विजयानंदानें बगारामाकडे बाल्यानें पाहिलें.

वालजीशेठ त्या खोलींत अस्वस्थपणें येरझाऱ्या घालीत होते. आधल्या रात्रीं मोटारींत घालून आणलेलें हें माणसाचें गाठोडें दोन पायांवर पुन्हा उभें राहतें कीं नाहीं याची त्यांना शंका पडली होती. नाहीं तर उपकार करावयाला जावें आणि भलतीच बिलामत अंगाला चिकटावी! त्या माणसाची हालहवाल पाहून यावयाला त्यांनीं बाल्याला आंत पाठविलें होतें. कधींच आंत गेला तरी तो बाहेर येत नाहीं म्हणून ते चिंताक्रांत झाले होते. त्या दालनांत डोकावून पाहावयाला देखील त्यांचा धीर होत नव्हता.

बाल्याच्या मागोमाग माणुसकींत परत आलेल्या बगारामाची मूर्ति पाहून शेटजींचा जीव एकदम खालीं पडला. वालजीशेठ दृष्टीस पडतांच बगारामानें त्यांच्या पायांशीं एकदम लोळणच घेतली.

"अरे, ए तमे काय करते एम! उठा, उठा!" वालजीशेठ एकदम चांकून बगारामाला वर उठवूं लागले. पण बगारामानें त्यांच्या पायाला कडकडून मिठी मारली होती.

"नाहीं–नाहीं, शेठ! तुम्ही माझे देव आहांत! तुम्ही मला आजचा दिवस दाखविलात! तुम्हीं मला जन्म दिलात!" बगारामाचें अंतःकरण अगदीं गहिंवरून आलें होतें.

"अरे, अमे तो काय केला! तुमची जिंदगी मजबूत एटले तुम्ही बगले!" वालजीशेठनीं बगारामाला उठवून शेजारच्या खुर्चीवर बसविलें. बाल्यानें एवढ्यामध्यें चहाचे पेले आणि इतर खाद्यपदार्थ आणून टेबलावर ठेवले होते. त्यांच्या दर्शनानें बगारामाचीं अगदीं आंतडीं तुटूं लागलीं.

"आतां तमे चाय पिवा अने खावा; पछी आपण वात करीशुं—अं!"

वालजीशेठनीं सांगावयाच्या आधींच बगारामानें चहाचा पेला तोंडाला लावला होता. भुकेनें वखवखलेल्या दुष्काळी भिकाऱ्याप्रमाणें त्यानें समोर ठेवलेल्या सर्व पदार्थांचा फन्ना उडवून टाकला. वालजीशेठ त्याच्याकडे पाहून गालांतल्यागालांत हंसत होते.

बगारामाचें खाणें उरकल्यानंतर शेठजींनीं त्याला हळुहळू सर्व हकीगत विचारून घेतली. त्यानेंही सुंद्रीच्या दर्शनापासून तों मोटारगाडीच्या खालीं

जीव द्यावयाला जाईपर्यंतची सर्व इत्थंभूत हकीगत आडपडदा न ठेवतां सांगून टाकली. एकही गोष्ट वगळली नाहीं !

" एटला बधा सुंदर हाय ते तुमच्या छोकरीच्या दांत ! " बगारामाची गोष्ट ऐकून शेठजींच्या डोक्यांत एकदम कसला तरी विचार आला.

" शेठजी, काय सांगू तुम्हांला ! मला वर्णन करून सांगतां यायचें नाहीं ! मीं तिच्या दांतांवर कविताच रचलेली आहे ! ओहो, अशी सुंदर कविता आहे ! फारच छान ! " बगाराम स्वतःशींच मिटक्या मारूं लागला.

" एम ? " शेठजींनीं आश्चर्यानें भुंवया उंचावून विचारिलें " तमे कविता बी करते ? "

' हें झाड तूं कापलेस ? ' असें बापानें विचारतांच जॉर्ज वॉशिंग्टननें जितक्या शांतपणें व निरपराधी मुद्रेनें उत्तर दिलें तितक्याच गंभीरपणें ' होय ' म्हणून बगारामानें सांगितलें.

" आमाला ते गाऊन दाव तमची कविता ! ते ऐकायची आमाला लई तरस लागली हाय ! " शेठजी अगदीं उताविळपणें म्हणाले.

बगारामानें घसा साफ केला व गाण्यास सुरवात केली.

**सुंदरि, सुरेख किति तव दांत ।**
**मोजुनि घ्यावे बत्तिस सगळे, एक उणा नच त्यांत !**
**शंख, शिंपले आणिक कवड्या यावर करती मात !**
**चणे, फुटाणे तशा सुपाऱ्या फोडिसि तूं निमिषांत !**
**हंसतां वाटे बत्ताशांची सांडतसे बरसात !**
**तोंड मिटवुनी बसति माकडें, हत्तिहि झुरती बनांत !**

बगारामाच्या तोंडून पहिलें कडवें बाहेर पडतांच, वालजीशेठ एकदम उठून उभे राहिले. त्यांची मुद्रा विजयानंदाच्या अपूर्व तेजानें झळकूं लागली. प्रत्येक कडव्याकडव्याबरोबर त्यांच्या तोंडावरील तेजाची चकाकी वाढूं लागली. क्रिकेटच्या चौरंगी सामन्यांतील शेवटच्या अटीतटीच्या खेळांत विजयी खेळाडूच्या प्रत्येक टोल्याबरोबर त्यांचे पक्षपाती प्रेक्षक हर्षातिरेकानें एकदम जसे उठून उभे रहातात, तशा बगारामाच्या प्रत्येक शब्दाशब्दागणिक शेठजींच्या भावना आनंदातिशयानें उचंबळूं लागल्या ! शेठजींचा उत्तेजक चेहरा पाहून बगारामाला नुसतें स्फुरण चढलें होतें. तो घसा खरडून

मोठमोठ्यानें ओरडत होता. शेवटचें कडवें संपून बगाराम धृवपदाकडे वळला नाहीं तोंच शेठजीनें एकदम उडी मारली व बगारामाला कडकडून आलिंगन दिलें.

" मारी नाख्युं–एकदम मारी नाख्युं ! " शेठजी एकदम क्लोरोफॉर्म घशांत गेल्याप्रमाणें चेहरा करून ओरडले. " अरे कमाल केली बगाराम तूं ! तुझ्या आगळ आमच्या ते दलपतराम अने नानालाल अने नरसिंहराव तो तद्दन यूसलेस ! एवी कविता मीं जन्मामंदी कोइ दाडे सांभळली नाय ! अरे, एच्यासाठीं तो मी आख्खी दुनियां धुंडाळली. पण कुठं मला मिळाली नाय् ! बगाराम केटलो मोठो कवी तूं ! तने मालूम नथी ! चालो, आपण ए कविता विकत घेईल ! बोल ! शू आपू ते ? तूं मागेल तेटला पैसा मीं तुला देल ! बोलो ! "

शेठजींना एवढा हर्षवायु कां झाला तें बगारामाला कळेना ! तो अगदीं बावचळुन गेला. पांच ओळींची कविता ती काय आणि ती ऐकून शेटजी नाचतात काय आणि कडकडून मिठी मारतात काय आणि वाटेल ते पैसे देऊन ती विकत घ्यायला तयार होतात काय ? सगळेंच आश्चर्य ! आपली कविता चांगली असल्याचा बगारामाला अभिमान वाटत होता. पण ती इतकी चांगली असेल अशी त्याची कल्पना नव्हती. तुमच्या राज्यांत सोन्याची खाण सांपडली आहे असें ब्रिटिश सरकारनें एकाद्या बुद्रुक संस्थानिकाला सांगून पाठविलें तर त्याला जितका आनंद होईल तितका आनंद व आश्चर्य बगारामाला वाटलें. तथापि कविता कितीही जरी चांगली झाली तरी बाजारांत तिला इतका भाव येईल असें जर त्याला कोणी सांगितलें असतें तर ती त्याला थट्टाच वाटली असती. कविता विकत घेण्याचा नाहीं तरी निदान कवितेचीं जुनीं पुस्तकें विकत घेण्याचा त्याला स्वतःला अनुभव होता, नव्हता असें नाहीं. कित्येक कवितेचीं पुस्तकें तर त्यानें फुकटांत पदरीं पाडून घेतलीं होतीं. असें असतां एका फुटकळ कवितेसाठीं एक मनुष्य वाटेल ते पैसे द्यायला तयार होतो—त्यांतल्या त्यांत एक गुजराथी माणूस तयार होतो— यापेक्षां महदाश्चर्य तें कोणतें ?

बगारामाला घुटमळलेला पहातांच शेठजी म्हणाले, " तूं नाय किंमत सांगेल तो मी सांगते, चालो. एक हजार रुपिया में देल तुमाला ! मग तो

झाला ! मी एकदां सौदा करतो. वायफळ बोलतो नाय् ! आत्तांचे आतां पैसा चुकता करून टाकेल ! ”

एक हजार रुपये ! सहा ओळींचे हजार रुपये ! हर्षातिशयानें उडी मारण्याची आतां बगारामाची पाळी होती. सबंध सहा ओळींत शंभर अक्षरें देखील भरायची पंचाईत. प्रत्येक अक्षरागणिक दहा रुपये ! सुंद्रीचे दांत कितीही सुंदर असले तरी तिच्या बत्तीस दांतांची किंमत ते तोंडांतून उपटून काढल्यावर बत्तीस पैसेदेखील यायची नाहीं. आणि त्याच दांतांच्या कवितेची किंमत हजार रुपये ! आतां मात्र बगारामाला संशय वाटूं लागला, कीं आपण स्वर्गांत आहों कीं काय ?

“ शेठजी, तुम्ही एकदां प्राण वांचवून जन्म दिलात ! आतां पुन्हां हें उपकाराचें ओझें डोक्यावर घालून मारून टाकूं नका. मला हजार रुपये काय करायचेत ! माझी योग्यता नाहीं इतकी ! मी फुकट देईन माझी कविता ! तुम्ही काय वाटेल तें करा तिचें ! ”

“ अरे, तूं काय पागल हाय काय ? असली कविता काय मफत देणार ? मी तुझे जग्यांत असतो तर बे हजाराखालीं उठवूं दिली नसती ही कविता ! समज्या ! तमी दक्षिणी तात्या लोक म्हंजे बद्धा कंगाल ! उगाच नाय पुण्याचा राज्य खलास केला ? अने तूं कविता मला मफत द्येल पण में घेयेल काय ? हुं बेपारी छुं ! मफत बिफत नाय मी जाणते ! रोख पैशाबिगर नाय वेवहार करीत. अरे, अने मी तो काय ए कविता खिशामंदी ठेवेल काय ? एच्या उपर तो मी लाख रुपया कमावेल ! ” वालजीशेठ अभिमानानें बगारामाकडे पाहूं लागले.

बगारामाच्या आश्चर्याची तर आतां सीमाच सुटली. हा वालजीशेठ म्हणजे काय कवितेचा घाऊक व्यापारी आहे—का कंत्राटदार आहे—क कारखानदार आहे—आहे तरी कोण ? का परदेशांत कवितांचीं पार्सलें रवाना करतो, का आगबोटी भरून कविता पाठवितो,—हा करतो तरी काय ?

“ शेठजी, मी शाळेंतल्या पोरांना जुनीं पुस्तकें विकणारा गरीब माणूस ! ” बगाराम अजीजीनें म्हणाला. “ मला महिन्याकाठीं हजार आणे देखील दिसायचे नाहींत; तर लाखाची गोष्ट कशाला ! तथापि, माझ्या गरिबाच्या या कवितेनें आपल्या व्यापाराला इतकी बरकत येणार असेल तर माझ्या-

सारखा धन्य समजावयाचा नाहीं मी कोणाला ! माझा प्राण आपण वांचविलात त्या कर्जाच्या पोटीं आपण ही फेड करून घेतली तर चालेल ! ”

“ अरे, आमी बेपारी बनिआ हाय पक्का ! मफत कोणाचा प्राण नाय वांचवेल ! ” वालजीशेठ हंसून म्हणाले. “ तुला कल्पना नाय तुझ्या गुणाची ! आमी पारख करते त्याची ! तुला मालुम हाय तुझ्या त्या पोरीचे दांत का सुंदर हाय यें ! ”

बगारामानें या गोष्टीचा कोठें विचार केला होता ?

“ आमी सांगते तुला. ते पोरीचें बत्तीसचे बत्तीस दांत शाबूत हाय ना ? एक बी किडला नाय–फुटला नाय ना ? आख्खी सुपारी फोडून टाकते ना ! ठीक ! मग मी सांगते ! सांगू तेच्या दांत का मजबूत हाय ते ? ” शेठजी अभिमानानें बगारामाकडे पाहूं लागले.

सुंद्रीच्या दंतसौंदर्याच्या रहस्यावर शेठजी काय अपूर्व प्रकाश पडणार त्याची बगारामाला कल्पना आली नाहीं. तो आ वासून त्यांच्याकडे पाहूं लागला.

“ उंः ! त्येमंदी काय हाय ! ते आमच्या ‘ जांबुवंत दंतमंजन ’ दांताला लावते ! नक्की ! ” शेठजीनें झांकली मूठ खुली केली.

जांबुवंत दंतमंजन ! हा काय प्रकार आहे ! आश्चर्यामागून आश्चर्य–रहस्यामागून रहस्य ! बगारामाचें डोकें गिरगिरावयाला लागलें.

“ तुमी आमच्या जांबुवंत दंतमंजन पायला नाय ! ऐकला बी नाय् ! ” शेठजींना भयंकरच आश्चर्य वाटलें. “ अरे आख्खी दुनिया आमच्या दंतमंजन वापरते. हिंदुस्थानमंदीच नाय–तो इंग्लंड अमेरिका जपानमंदीबी आमच्या माल जातो. आमची केटली मोठी फेक्टरी हाय माटुंग्याला ! बे हजार माणस काम करते तेमंदी ! आमी दंतमंजन करते; खासी, खोकला, दमा, खरूज यांचा बी दवा बनवते ! आमच्या जांबुवंत दंतमंजनला तो समद्या दुनियेमंदी मेडल मिळाला हाय ! ”

कुबेराच्या ऐश्वर्याचें वर्णन ऐकून देखील बगाराम इतका चकित झाला नसता. त्याच्या चेहऱ्याचें एकदम दीर्घवर्तुळ झालें !

“ तुबी आमच्या दंतमंजन तो दाताला लाव ! मंग तुझे बी दांत तें पोरीच्या दांताच्या सवाई होएल ! ” शेठजी हंसत हंसत म्हणाले.

बगारामानें लाजून आपले ओंठ एकदम मुडपून घेतले. सुंद्रीच्या दांतांवर

कडी करणें म्हणजे काय सोपी गोष्ट आहे ! शेठजीनें अजून पाहिलें नाहीं म्हणून ! शेठजींच्या दंतमंजनाचा कारखाना जरी कोणी दांतांवर ओतून घेतला तरी सुंद्रीच्या दांतांवर ताण करतां येणें शक्य नाहीं !

" शेठजी. तुमचें हें दंतमंजन आमची ती मुलगी दांताला लावते कीं नाहीं मला माहीत नाहीं. इतक्या सकाळीं तिला पहाण्याचा अजून प्रसंग आलाच नाहीं. तें जाऊं द्या ! पण मला एवढें सांगा कीं, माझ्या कवितेचा आणि तुमच्या जांबुवंत दंतमंजनाचा संबंध काय तें ? अजून माझ्या लक्षांत आलें नाहीं कांहीं ! " ज्योतिबा फुल्यांच्या धोंडीराम शिष्यानें आपल्या गुरूला जितक्या आदबीनें प्रश्न विचारला असता तितक्या विनयानें बगारामानें आपली शंका शेठजींच्या पुढें मांडली.

शेठजी मोठमोठ्यानें हंसूं लागले. " केटलो पागल छे तूं बगाराम ? हजुं ध्यानमां नथी आव्युं ? अरे, तुझी ए कविता तो आमे ॲडव्हरटाइजमेंट तरीके छापणार–जाहिराती दाखल छापणार ! उपर एक सुंदर बाईलोकाचा फोटो अने खाली तमारी कविता ! तुझ्या ते पोरीचा फोटो पायजे तर आमी छापेल ! अने अख्ख्या दुनियेला अमे प्रश्न करेल, कीं बोला, ए बाईच्या दांत कशा सुंदर झ्याला ! आं ? जांबुवंत दंतमंजन वापरते म्हणून ! " शेठजी पुन्हा मोठमोठ्यानें हंसूं लागले. स्वतःच्या अपूर्व शोधावर ते अगदीं निहायत खूष झाले होते !

एकाद्या जादूगारानें मूठभर माती घेऊन त्याची रुपयाची रास बनवावी तसा हा बगारामाला चमत्कार वाटला. उगाच नाहीं गुजराती लोक क्रोडोपति झाले !

" बगाराम. चाल. आमे तुज्याशीं करारच करते आतां ! " शेठजी ताठ उठून एकदम गंभीरपणें बोलूं लागले. " चाल, तूं आमचेकडे नोकरीला रहा आजपासून ! अमे तुला सो रुपिया दरमहा देएल ! एकेक दव्यावर आमाला एकेक कविता करून दे तूं ! अगदीं बराबर येच्यासारखी ! आमच्यापाशीं अजून कितीतरी दवे हायेत ! खासी, खोकला, खरूज ! चाल, कबूल हाय ?"

" शंभर रुपये दरमहा ! शं–भ–र रु–प–ये पगार ! कबूल म्हणून काय विचारतां ? एकदम कबूल–सपशेल कबूल ! " बगारामानें शेठजींच्या पायांवर पुन्हां एकदम लोळण घेतली.

" पण शेठजी, माझ्या त्या दुकानाचें काय करायचें ? " बगारामाचा चेहरा जरा चिंताक्रांत झाल्यासारखा दिसला.

" उंः, अरे, ती दुकानच्या काय बोलून राहिलास ? टी दुकान मी शमदा घेएल विकत ! आमच्या कारखान्यांत दवा बांधायला अमी ते कागळ वापरेल ! "

बगाराम ताडकन् उभा राहिला ! तात्याबानें लाथाडलेला—सुंद्रीनें झिडकारलेला—बबन्यानें गचांडी दिलेला, आणि निराशेनें मोटारगाडीखालीं जीव द्यायला गेलेला कालचा बगाराम—तो बजरंग बुकडेपोचा दरिद्री मालक बगाराम—आज एका सहा ओळींच्या कवितेवर हजार रुपये मिळविणारा आणि दरमहा शंभर रुपये कमावणारा प्रतिष्ठित पगारदार झाला होता ! कालचा बगाराम मोटारगाडीखालीं चिरडून मेला ! आजचा बगाराम वालजी शेठच्या ' दंतमंजनाच्या ' डबींतून ' रिपेर ' केलेल्या मोटारगाडीप्रमाणें कोरा करकरीत होऊन बाहेर पडला होता !

आतां पाहतों त्या तात्याबाची मिजास ! जुन्या पुस्तकांच्या उकिरड्यावर लोळणारा गाढव काय मी ? चिंध्याविक्या काय ? थांब, तुझ्या पीयूष चहाचा बंब डांबराच्या बादलीसारखा तुझ्या टाळक्यावर उपडा करतों ! आणि त्या सुंद्रीची तरी काय तमा आतां ! नाकांत घातलेल्या नथेप्रमाणें स्वतःचे दांत स्वतःभोंवतीं ओंवाळून घेत बसते ! काय पण मिजास ! तिच्यासारख्या छपन्न पोरी तिच्या दांतावर फेंकून देईन आतां !

" तिच्या नाकावर टिच्चून दुसरी करीन ! " हे बाल्याचे शब्द बगारामाच्या कानांत घुमूं लागले. त्याचे डोळे वीरश्रीनें चमकूं लागले. ओंठ कांपूं लागले.

आणि तो बबन्या ! मोटारच्या तेलारोगणानें माखलेला बेंगरूळ मारुती ! बगारामाच्या अंतःकरणांत सूडाच्या ज्वाला थैमान घालूं लागल्या ! आपल्या कल्पनेंत उभारलेल्या प्रतिस्पर्ध्याचा गळा दाबण्यासाठीं त्याचा हात नकळत वर उचलला गेला—

तोंच समोरच्या दारांत बबन मूर्तिमंत उभा ! सांधा निखळल्याप्रमाणें बगारामाचा हात खट्कन् खालीं पडला. त्याच्या छातींत भूकंपाचा धक्का बसला. हा सैतान इकडे कुणीकडे ?—अजून आपल्या पाठीमागें ?—

" अरे बबन, आज अमे नाय् जाएल भाएर ! " बबनला पाहून वालजीशेठ उद्गारले, गाडी गॅराजमंदीच ठेऊन दे—अरे, पण थांब. ए बगारामसेठला जरा भाएर जायचं हाय्—! "

बगारामशेठ ! हा बगारामशेठ कोण नवीन उपस्थित झाला ! आणि हा आला केव्हां इथें ? बाटलींतून ब्रह्मसमंध बाहेर पडावा तसा काल रात्रीं आणलेल्या गठडींतून हा बगारामशेठ बाहेर पडला कीं काय ? डोहांत बुडत असल्यासारखी मुद्रा करून बबन बगारामाकडे पाहूं लागला. होय, तोच तो जरीपुराण्या सुंद्रीपाशीं आपली बदनामी करणारा तोच तो भेकड रद्दीविक्या ! बर्फाचा शिराळशेट बनवावा तसा बबन जागच्या जागीं थंडगार पडला. हायरे नशिबा, आधीं जर ठाऊक असतें तर खुशाल याच्या छाताडावरून गाडी नेऊन रस्त्याच्या धुळींतच याचें दफन केलें असतें ! पण आतां काय त्याचें ! काल रात्रीं गाडींतून आडवा आणलेला हा मुडदा उभा बसवून आज हिंडायची पाळी येणार आपल्यावर !

" बगाराम, तूं ज्या संगात ! बजारमंदी जाऊन च्यांगले कपडेबिपडे करून ये, ज्या ! बबन, ए शेठ सांगेल तिकडे ने आं तेला ! " ब्रिटिश सरकारच्या हातांत सांपडून निशस्त्र झालेल्या थिबा राजाप्रमाणें बबननें बगाराम शेठला जुलमाचा सलाम केला.

बगारामाच्या अन्तःकरणांत सूडाच्या देवता पंचपक्वान्नांवर ताव मारून जलौष करीत होत्या ! बबनच्या खांद्यावर बसून त्याच्या दोन्हीं झिंज्या तोडायचेंच त्यानें आतां बाकी ठेवलें होतें.

मास्तर मेल्याची सुटी मिळाल्यामुळें नाचत शाळेबाहेर पडणाऱ्या पोरांप्रमाणें उडया मारीत बगाराम खोलींतून बाहेर पडला. बोलका ढलपा भिरकावीत निघालेल्या भिक्षाप्रमाणें वालजीशेठनें त्याला दिलेल्या नोटांचें पुडकें तो डोक्यावर नाचवीत पळाला.

बबन मान खालीं घालून आधींच मुकाट्यानें चालता झाला होता.

## ७

चारदोन दिवसांनंतर एका दुपारीं 'नंदनवन विश्रांतिगृहा' च्या समोर एक मोटारगाडी येऊन उभी राहिली. नेहमींचीच येणारी होती गाडी ती.

मोटारगाडीचा आवाज ऐकून सुंद्री सहर्ष मुद्रेनें आंतून धांवत आली. तात्याबा नेहमींच्याच खुर्चीवर बसले होते. त्यांनीं देखील नीट मांडी घातल्यासारखें केलें व गळयांतील कळकट जानव्याचा जुडगा सांवरला.

मोटारीचें मागील दार उघडलें गेलें व आंतून एक निराळाच गृहस्थ बाहेर उतरला. सुंद्रीच्या दांतांवर ओंठांचा एकदम अभ्रा चढला गेला व तात्याबा मांडी मोडून खडबडून उठले. त्या नवीन गृहस्थानें डोक्यावर जरीच्या काडयांचा मोठा केशरी रुमाल ऐसपैस बांधलेला होता. अंगांत काळया रंगाचा रेशमी कोट, बारीक किनारीचें पांढरें स्वच्छ धोतर व पायांत पिवळया रंगाचा पातळ स्लीपर असा त्याचा थाट होता. तात्याबा अगदीं आश्चर्यचकित झाले. 'अभाग्याचे घरीं बाबा ही कुठून कामधेनु आली' हें त्यांना कळेना ! आणि सगळयांत आश्चर्य म्हणजे मोटारच्या पुढल्या बाजूला लगामचाकावर डोकें टेंकून बबन—नेहमीं धैर्यधरासारखा दणदण करीत दुकानांत येणारा बबन—अगदीं शुंभासारखा स्वस्थ होता. खास मालकच असावा हा आपल्या बबनरावाचा !

लग्नानंतर प्रथमच गृहप्रवेश करणाऱ्या नवरदेवाच्या विजयानंदानें आणि वीरश्रीनें तो नवखा गृहस्थ दुकानाच्या पायऱ्या ताड्ताड् चढून वर गेला. तात्याबांनीं एकदम कोपरापासून हात जोडून व पंजांच्या फटींत मानगूट रोवून भोर संस्थानांतल्या आश्रिताप्रमाणें त्याला अदबीनें नमस्कार केला.

किती वेळ तरी तात्याबा आपली मान वर करीनात. आलेल्या गृहस्थानें तात्याबांच्या डोक्यावर प्रेमळपणानें थापटल्यासारखें केलें आणि तो म्हणाला, "क्षमा केली आहे तुम्हांला तात्याबा ! पुन्हां नका असें करूं ! उचला वर डोकें आतां !"

डोक्याला विंचू चावल्यासारखी तात्याबांनीं आपली मान वर उडवली व ते एकदम मागें सरकले. केशरी रुमालाच्या खालीं आणि कोटाच्या काळया कॉलरीच्या वर त्यांना बजरंग बुकडेपोच्या मालकाचें मुंडकें हळुहळू दिसूं लागलें. कोण—बगाराम ! खादीच्या टोपीची चुरमुडलेली चुंबळ डोक्यावर घालून आणि मांजरपाठाचें कुडतें खांद्याला अडकावून पुस्तकाच्या कचरा-पेटीवर बसणारा बगाराम ! अमावास्येच्या रात्रीं ओंकारेश्वराच्या रस्त्यानें जाणाऱ्या इसमासारखा तात्याबांचा चेहरा एकदम पडला.

त्यांच्या अंगाला दरदरून कंप सुटला. ते मागल्या पायानीं आपल्या खुर्चीपाशीं आले आणि मट्कन् खालीं बसले.

आय्. सी. एस. परीक्षा पास होऊन स्वतःच्या खेडेगांवीं प्रथमच आलेल्या एकाद्या चवंढाळ तरुणाप्रमाणें बगाराम नाक उडवीत व भुंवया मुरडीत दुकानांचें निरीक्षण करीत एका खुर्चीवर जाऊन बसला.

सुंद्री एकाद्या पालीसारखी एका कोपऱ्यांत चिकटून बसली होती. मधून-मधून बिनअभ्र्याची वेताच्या काड्यांची छत्री उघडावी तशी तिनें आपल्या दांतांची उघड झांप चालविलेली होती.

" सुंद्रे ! " प्रतापरावांच्या सुरांत बगाराम ओरडला.

सुंद्रीच्या अंगावर शहारा उठला !

" एक कप चहा आण ! "

मंतरलेल्या माणसासारखी सुंद्री बंबाजवळ गेली व कांपऱ्या हातांत चहाचा कप घेऊन टेबलाजवळ आली.

" मला नको ! तो तिकडे रस्त्यावर तुझा बबन्या बसला आहे, त्याच्या नरड्यांत हा आधणाचा काढा ओत ! जा ! "

सुंद्री भेदरल्यासारखी झाली.

" जा, उभी राहूं नकोस—दे नेऊन त्याला ? थट्टा नाहीं ! " बगारामाचा सूर जास्तच चढला.

आर्यस्त्रीच्या आज्ञाधारकतेनें सुंद्री चहाचा कप घेऊन बाहेर गेली व तिनें बबनच्यापुढें चहाचा कप केला. झोपेंतून उठल्यासारखें बबननें वर पाहिलें व शांतपणें कप रस्त्यावर उपडा करून पुन्हां बशींत ठेऊन दिला. सुंद्री मुकाट्यानें दुकानांत परत आली.

" सुंद्रे ! " बगाराम दुसरा ऑर्डिनन्स ओरडूं लागला.

सुंद्री बगारामाशेजारीं येऊन कांपत कांपत उभी राहिली. तो तिच्याकडे रोंखून पाहूं लागला. क्षणभर तो कांहीं बोलला नाहीं. सुंद्रीला जरा धीर आल्यासारखें वाटलें. किंचित् हंसण्याचा प्रयत्न करून ती अखेरशेवटीं घुटमळत म्हणाली, " बगारामबुवा—"

बगाराम ताडकन् उठून उभा राहिला.

"सुंद्रे, तुझ्या चहाचें आधण माझ्या अंगावर ओतलेंस तरी हरकत नाहीं; पण मेहरबानी करून मला बगारामबुवा म्हणूं नकोस!

"बगाराम," सुंद्री चट्कन् लाडिकपणाचा अविर्भाव आणून म्हणाली, "आज मोटारींतून मला फिरायला—!"

"सुंद्रे!" तिला मध्येंच थांबवून बगाराम ओरडला. "मला एक कप चहा घेऊन ये पाहूं!"

हिरमुसल्या तोंडानें सुंद्रीनें चहाचा कप भरून आणला. काहीं न बोलतां बगारामानें शांतपणें चहा संपविला.

"बगाराम, माझें पहिलीचें पुस्तक—" सुंद्री ओंठांतल्या ओंठांत पुन्हां पुटपुटली.

"सुंद्रे, काड्याची पेटी आण पाहूं!"

तोंडांत घातलेली सिगारेट ऐटीनें शिलगावीत बगाराम एकदम उठला. संक्रांतीचा हलवा काढावा तसे त्यानें खिशांतून बरेचसे रुपये, नाणें, खुर्दा बाहेर काढला व टेबलावर पिसकारीत तो म्हणाला, "सुंद्रे, हे बघ. हे दोन कपांचे दोन आणे! हा एक रुपया तुझ्या डोक्याला लावायला शिकेकाई व खोबरेल तेल आणायला! हे सहा रुपये व आठ आणे तुझ्या वडलांना दे—वर्षाचे आगाऊ दाढी करण्यासाठीं! आणि हे चार आणे त्यांचें जानवें परटाकडून धुऊन आणण्यासाठीं; झालें, आतां राहिला तुझा बबनराव! हा एक रुपया त्याचें हात नि तोंड धुण्यासाठीं सनलाईट साबू आणायला! आणि हे पांच रुपये, तुझ्या लग्नाच्या वेळीं त्याला कोरी बँडवाल्यासारखी थबडकी टोपी आणायला! माझा अहेर म्हणून समज! किती झाले? तेरा रुपये आणि चौदा आणे! घे मोजून!"

सिगारेटच्या धुराचे भपकारे दुकानभर सोडीत बगाराम ताडताड दुकानाबाहेर पडला.

राजाबाई टॉवर कोसळल्यासारखी सुंद्री कोसळली! आणि तबकडी उडालेल्या घड्याळासारखा चेहरा करून मावळत्या बगारामाच्या पाठीकडे पहात ती उभी राहिली!

दुकानापुढची मोटार केव्हांच निघून गेली होती. तिच्या मागून निघालेल्या धुळीचा व धुराच्या लोटाकडे पहात तात्याबा विषण्ण चित्तानें गुणगुणूं लागले—

**इस तन धनकी कौन बढाई!**



# बाळूची बायको

तसें पाहिलें तर बाळूची व माझी विशेषसी मैत्री नव्हती. लहानपणापासून तो व मी एका शाळेंत शिकलेलों. तो माझ्यापुढें एखादें वर्ष असेल इतकेंच काय तें. पण अभ्यासासंबंधीं विरोधी भक्ति, शाळेबाहेरील इतर सर्व 'चळवळी' मध्यें भाग घेण्याची उत्सुकता, केंसांचा भांग व धोतराचा काच्या 'झ्याकीत' ठेवण्याबद्दलची आस्था इत्यादि 'गुण' दोघांत सारख्याच प्रकर्षानें असल्यामुळें आम्ही दोघे एकमेकांला चांगलेच ओळखून होतों. जोगळेकराच्या हॉटेलांत आम्हीं दोघे बरोबरीनें कधींच गेलों नसलों तरी दोघांचा त्याठिकाणीं 'साहेबजी' झाला नाहीं असा त्या वेळीं क्वचितच एकादा दिवस गेला असेल. 'आर्यन'च्या शेवटच्या 'शो' ला मसालेदार पट्टी दातांत चघळीत शेवटच्या रांगेला जाऊन बसावें व मध्येंच उजेड होतांच आजूबाजूला आपल्या ओळखीचीं कुळें आहेत किंवा नाहींत तें चौकस नजरेनें पहावें तोंच दोन रांगा टाकून पलीकडे एका खुर्चीवर पाय पुढें तणावून बसलेल्या बाळूचा अर्धचेहरा दिसला नाहीं असें कधींच व्हावयाचें नाहीं. शाळेमध्यें एकमेकांची गांठ महिना महिना पडली नाहीं तरी बँडच्या दिवशीं 'एम्प्रेस गार्डन' मध्यें, रविवारीं संध्याकाळीं बंडगार्डनवर व इतर दिवशीं सायंकाळीं फर्ग्यूसनच्या टेकडीवर एकमेकांची नजरभेट झाली नाहीं असें कदापिही व्हावयाचें नाहीं.

एवंच, आम्ही एकमेकांच्या खांद्यांवर हात ठेवून सायकलवर फिरणारे दोस्त नसलों तरी एका कक्षेत फिरणारे ग्रह होतों. ग्रहमालिकेंत अहोरात्र फिरणाऱ्या नवग्रहांत हा मागें व तो पुढें अशी ज्याप्रमाणें नंबरवारी लावतां येणें अशक्य आहे, तद्वत अभ्यासाचे–नव्हे इयत्तेच्या बाबतींत बाळूची एक वर्षाची वडिलकी वजा केली तर बाकीच्या गोष्टींत आम्ही दोघेही एकमेकांला हार जाण्यापैकीं नव्हतों. बाळूनें 'स्टूडंटस् स्नफ्' ची बाटली खिशांत

बाळगण्याचे आधींच मी पानपट्टीची डबी कोटाच्या आंतल्या कप्प्यांत ठेवून राहिलों होतों. स्वतःची उगवलेली शेंडी बाळूनें छाटण्याआधींच ओठांवर न उगवलेल्या केसांची साफ सफाई करण्याची मीं सावधगिरी बाळगलेली असल्यानें, बाळूला मीं केंसभरही पुढें जाऊं दिलें नाहीं. मात्र एका बाबतींत बाळूनें मला चांगलेंच चीत केलें. मी ' पासिंग शो ' चें पहिलें पाकीट विकत घेतलें असेल नसेल, तोंच मला बाळू ' लखपती ' च्या पुस्तकाचीं पानें उलटून त्यावर पेन्सिलीच्या खुणा करीत असतांना दिसला.

त्या दिवसापासून बाळूच्या संबंधीं माझें मत पार बिघडून गेलें. बाकी त्याचें माझ्यासंबंधीं काय मत होतें तें कळण्याला मला मार्गच नव्हता. यापुढें बाळूच्या संबंधीं मी वाटेल त्या बातम्या ऐकावयाला तयार झालों होतों. नाटकांतील स्त्रीपार्टी, डोअरकीपर, स्टेशनवर नंबरटेकर, झिंज्या वाढविलेला सिनेमानट, रेसकोर्सवर 'वधारो' विकणारा पोऱ्या, इ० अनेक हुद्यांच्या जागा मीं बाळूसाठीं कल्पनेनें चितारून ठेविलेल्या होत्या. त्या वर्षी बाळू प्रिलीमिनरी परीक्षेंतून पसार होण्याच्या ऐवजीं त्या परीक्षेआधींच पसार झाल्याची बातमी कळली. मला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. लांबचा नातेवाईक मेल्याची बातमी ऐकून क्षणैक गंभीर चेहऱ्यानें ' सुटला एकदांचा ' या अर्थी सुस्कारा टाकणाऱ्या माणसाइतकाच मला बाळू ' अभ्यासी जगांतून ' सुटल्याबद्दलचा विषाद वाटला. त्यानंतर तो पुन्हा मला कधीं दिसला नाहीं व मींही त्याच्या-संबंधीं कधीं कोणापाशीं चौकशी केली नाहीं.

२

पुढें चार वर्षांनीं मी बी. ए. च्या परीक्षेस बसण्यासाठीं मुंबईस गेलों होतों. परीक्षा आटोपल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं दुपारीं बोरीबंदरवर रेल्वेंत माझे एक मावसभाऊ नोकरीस होते. त्यांना भेटून आलों व परत गिरगांवांत जाण्यासाठीं सहा नंबरची ट्रॅम पकडावी म्हणून मी एम्पायर हॉटेलच्या समोर उभा राहिलों. बराच वेळ झाला तरी ट्रॅम येईना. उभें राहून अगदीं कंटाळा आला होता व अंगाचा विलक्षण उकाडा होत असल्यामुळें घसाहि कोरडा पडला होता. म्हणून कोपऱ्यावरच्या इराण्याच्या हॉटेलांत थोडेंसें ' ड्रिंक ' घ्यावें म्हणून आंत शिरून एका कोंपऱ्यांतील टेबलाशीं बसलों. ' एक

आईस-लेमन ' म्हणून मी पोऱ्याला ऑर्डर देऊन जरा इकडे तिकडे पहातों तों माझेपासून दोन हातांवर दुसऱ्या एका टेबलावर एका बशी भरून आणलेल्या कालवणांतील कसल्याशा गोळ्यांवर कांटा–सुरी चालवीत असलेला बाळू दृष्टीस पडला ! इतक्या वर्षांनंतर अशा अचानक तऱ्हेनें बाळू दृष्टीस पडतांच मीं पूर्वीच्या अप्रिय आठवणी क्षणमात्र बाजूला ठेवून त्याला हांक मारली. कदाचित् आपण त्याला ' असलें कांहींतरी ' खातांना पाहिलें म्हणून तो शरमून फारसा बोलणार नाहीं असें मला क्षणमात्र वाटलें. पण मला पहातांच ' Hallo, old chum ! ' म्हणून तो उठून जवळ आला व जोराचें हस्तांदोलन करून मला आपल्या टेबलावर घेऊन गेला. ऐटबाज इंग्लिशमध्यें बाळूला बोलतांना मीं प्रथमच ऐकलें. ही त्याची अलीकडचीच कमाई असावी असा मीं तर्क केला. त्याचा चेहराही फारसा बदलला नव्हता; पण वयाची वाढ त्याच्या साफसूफ केलेल्या गाला-वरील हिरवसर रंगावरून दिसून येत होती. अंगांत एक काश्मीरी कोट, खालीं डकची पांढरी विजार व डोक्यावर फरची सैल टोपी—बाळू पक्का मुंबईकर बनला होता. त्याच्यापुढें पुणेरी धोतर–वहाणांत बसतांना माझी मलाच लाज वाटूं लागली.

" दोस्त, फार दिवसांनीं भेटलांत ! So glad to meet you ! पुण्याची बातमी सांगा आधीं ! बरं, तुम्हांला काय मागवूं ? पॅटीस मागवूं कां क्रीमचॉप पाहिजे ? का नुसते ऑम्लेटच चालेल ! हे पहा, We have met after so many days ! आतां We must have a jolly good time ! बाकी सर्व मंडळी ठीक आहेत ना ? केम् तमे पोते तो मजामां छो ने ? "

बाळूला गुजरातीही येऊं लागलें वाटतें ! त्याची ती बोलण्याची पद्धत व माझ्याविषयींची विलक्षण सलगी पाहून तर मीं मागविलेलें पेय पिण्याचें आधींच गार झालों. माझ्या पूर्वीच्या अटकळी पार चुकीच्या ठरल्या तर ! ' कारटें लकी आहे ' असें मनांत मी पुटपुटलों देखील.

" हें पहा बाळोबा, आम्हीं बोलून चालून पुण्याचे—तुमचें तें मुंबईचें खाणें-पिणें आम्हांला नाहीं जुळायचें ! " खाण्याच्या बाबतींत आपण इतकें मागासलेलें असल्याचें बाळूच्यापुढें कबूल करतांना किती वाईट वाटलें तें सांगतां येत नाहीं. पूर्वी असा त्याला हार गेलों असतों काय ? " मीं लेमन

मागविलें आहे आतांच ! मला नको आतां कांहीं !" नंतर आठवण झाल्या-सारखें करून अगदीं 'फर्ग्यूसनी' उच्चारांत 'थ्यांक्यू' म्हणून मी घाईघाईनें म्हणालों. बाळूच एकटा इंग्रजी कांहीं शिकलेला नव्हता.

"छट् ! लेमन राहूं दे बाजूला. निदान रास्बेरी—आइस्क्रीम तरी घेतलें पाहिजेच !"

मी नको नको म्हणावयाच्या आधीं बाळूनें ऑर्डर देखील देऊन टाकिली होती. चोरांच्या गुहेंतील अपरंपार संपत्ति पाहून भांबावलेल्या अलीबाबांच्या आश्चर्यानें मी बाळूच्या औदार्यवृत्तीकडे पहात होतों. वास्तविक शाळेंत असतांना त्यानें माझ्यासाठीं कधीं एक पैही खर्च केली नसेल. मग आतांच त्याच्या अंतःकरणांत माझ्याविषयीं प्रेमाचा राजापुरी झरा कसा उपटला ! सुमारें अर्धातासभर आम्ही त्या ठिकाणीं बसलों होतों. बाळूच्या तोंडाची सारखी टकळी चालली होती. मला बोलायला त्यानें सवडच दिली नाहीं. तो काय करतो, कुठें असतों त्याला पगार किती आहे इत्यादि गोष्टी त्याला विचारण्याचें मला धाडसच झालें नाहीं. 'खंबाला हिल' 'शांतीदास रंगीलदास,' 'फियट गाडी,' 'कूपरेज,' 'व्हाइट सिटी,' 'फर्स्ट एन्-क्लोझर,' 'जॉर्ज रेस्टोरां' इत्यादि मला दुर्बोध असलेले कितीतरी अपरिचित शब्द त्याच्या भाषणांत वारंवार येत होते. मेडिकल स्कूलमध्यें एकदां अने-टमीच्या व्याख्यानाला एका मित्राबरोबर गेलों असतांना माझ्या कानांवरून लांबलचक शब्दांची जी अनोळखी घोडदौड गेली त्याचीच पुनरावृत्ति बाळूचें संभाषण ऐकतांना झाल्यासारखें मला वाटलें. एकंदरींत बाळू खूपच चैनींत असला पाहिजे असा मीं कयास बांधला. त्याचें रिस्टवॉच, खिशांतून डोकावणारा रेशमी रुमाल, सिगारेटची ऐटदार पेटी, सिगारेट 'पिण्याची' रंगीत बांकदार नळी, बोटांतली आंगठी व त्यांत अडकाविलेलें ट्रॅमचें तिकीट—ग्रँड ! मला बाळूचा अगदीं हेवा वाटूं लागला. बोरीबंदरवर मी ज्या मावसभावाला भेटावयास गेलों होतों तो मॅट्रिक फेलच होता. त्याच्या-पुढें माझ्या बी. ए. परीक्षेची हकीगत सांगतांना मला स्वर्गाच्या तुळया डोक्याला लागल्याचा भास होत होता. पण आतां या नॉन--मॅट्रिकपुढें मला शनिवारवाड्याच्या दिंडींतून जात असल्याचा भास झाला. अखेर 'किर्लोस्कर—पंपाचा दांडा हलविल्याप्रमाणें माझ्याशीं जोराचें पुन्हा हस्तांदोलन करून',

सिगारेटच्या धुराचे फवारे सोडीत 'चीरिओ' म्हणून तो चालता झाला. त्यानें दिलेली जाड सोनेरी टोंकाची सिगारेट मीं शांतपणें खिशांत ठेवून उठलों. उतरलेल्या ठिकाणीं परत आल्यावर बाहेर कुठें गेलोंच नाहीं. बाळू हा विषय सारखा डोक्यांत घोळत होता. मधेंच डिक्शनरी उघडून बाळूनें उच्चारलेल्या 'चीरिओ' शब्दाचा अर्थ देखील पाहिला. कमाल आहे! कारटें हुषार आहे! उगाच नाहीं! बाकी नशिबवानही आहेच! नुसतें बी. ए. होऊन काय करावयाचें?—

३

या गोष्टीला सातआठ वर्षें होऊन गेलीं असतील. मी त्यावेळीं मुंबईंत एका इंग्रजी शाळेंत मास्तर होतों. गिरगांवांत एका अंधाऱ्या चाळीच्या दुसऱ्या मजल्यावरील एका अरुंद खोलींत मी एक-तृतीयांश भाडेकरी होतों. बाकीचे दोघे असेच कोठेंतरी नोकरीस होते. सकाळीं उठून प्रार्थनासमाज समोरील हॉटेलांत एक 'सिंगल' व छटाक शिरा घशाखालीं घालून, थोडेसें इकडे तिकडे हिंडावयाचें. नंतर 'बाळा भागवता' च्या खानावळींतील पहिली पंगत पकडावयाला पळावयाचें. तिथें चारदोन घांस खाऊन शाळेचा रस्ता गांठावयाचा. पांच वाजतां चौपाटीच्या वाळूंत जाऊन पसरावयाचें. तेथें अर्धा आण्याची खारी शेंग खाऊन पुन्हा 'बाळा भागवता' च्या 'गुत्त्यावर' यावयाचें. फार झालें तर क्वचित् एखाद्या रात्रीं ग्रँटरोडवर चक्कर मारून यावयाचं! अशा तऱ्हेनें माझें आयुष्य चाललें होतें. मुंबईचा अगदीं वीट आला होता. पण करणार काय? एके दिवशीं संध्याकाळीं बाळा भागवतास छाट मारून 'माधवाश्रमा' ची लज्जत घ्यावी असा विचार करून तिकडे वळलों. खिशांत अवघे चौदा आणे होते. बारा आण्यांत माधवाश्रमांतील जेवण उरकून व बाहेरील टेबलावर ठेविलेली सुपारी सढळ हातानें तोंडांत टाकून ती चघळत चघळत मी बाहेर पडलों. तोंच उजव्या बाजूनें येणाऱ्या एका जोडप्याकडे माझें लक्ष गेलें. कोण? बाळू! शक्य नाहीं! पण तोच! होय. बाळूच तो! पूर्वीचा त्याचा अवतार किती बदललेला होता. त्याचें शरीर आतां स्थूल झालेलें होतें. डोक्यावर पूर्वीच्याच काळजीनें भांग पडलेला, अंगांत काळा सर्जचा शॉर्ट कोट व आंत पोलो गळपट्टीचा पांढरा शर्ट, पायांत

खाकी अर्धी विजार, उंच पायमोजे, हातांत एक बारीक छडी–आणि बरोबर वीस वर्षांची मुंबईपद्धतीचा शृंगार जरा फाजीलच थाटानें केलेली एक सुंदर तरुणी ! दोघेंहि एकमेकांशीं मोकळेपणानें बोलत व हंसत येत होते.

ही कोण ? बाळूची बायको ? Impossible ? शक्यच नाहीं ! नशीबवान् झाला म्हणून काय झालें ! तो कांहीं शिकलेला थोडाच आहे ? चार पैसे खिशांत असले म्हणून असल्या उधळ्या व छानछोकीच्या माणसाला कोण बायको देतो आहे !

आपण त्याच्या नजरेस पडूं नये म्हणून मी तसाच मागें पायरी चढून माधवाश्रमांत शिरलों. ' वेस्ट एन्ड ' सिनेमाच्या दारांकडे ते चालले होते.

" बाकी माणिक, तुझें म्हणणें मुळींच—" बाळूचें परिचित आवाजाचे शब्द माझ्या कानांवर आले. मागून येणाऱ्या मोटारीच्या आवाजांत पुढील भाग मला ऐकूं आला नाहीं.

तो तिला माणिक म्हणतो ? मग अगदींच clear ती त्याची बायको असणें शक्यच नाहीं ! असल्या उपऱ्या माणसाला बायको ? मी क्षणैक मनांत हंसलों; पण मनाचें समाधान झालें नाहीं. ही त्याची बायको नाहीं तर मग कोण ? खास, बाळूची कांहींतरी भानगड दिसते आहे ! बाकी कारटें पहिल्यापासूनच तसें म्हणा ! I am not surprised ! किंचित्काळ मी विचारांत पडलों. खिसे चांचपून पाहिलें. फक्त दोन आणे शिल्लक होते. तसाच धांवत वेस्ट एन्ड सिनेमाकडे गेलों. तिकिटाचे दारापाशीं जाऊन ' एक दोन आण्यांचें तिकिट द्या ! ' म्हणून जोरानें ओरडलों. ' दोन आण्यांचें तिकिट शिल्लक नाहीं ! ' असें आंतून उर्मट आवाजांत उत्तर आलें. हातांत काढलेलें दोन आण्यांचें नाणें तसेंच खिशांत टाकीत मी परतलों. जाऊं द्या झालें ! करायचें काय आपल्याला ? इतक्यांत ' बाल्कनी 'च्या दारांतून सिनेमागृहामध्यें शिरतांना बाळू व त्याचें ' कुटुंब ' पुन्हा दृष्टीस पडलें ! जाऊं द्या का म्हणून ! एकदां दुरून पहायचें; माहिती असावयाला काय हरकत आहे ? म्हणजे पुन्हां भेटला तर असल्या माणसाशीं संगत नको.

दोन आण्यांचें कथली नाणें पुन्हा पुन्हा तपासून पाहिलें. सर्व खिशांचे कानेकोंपरे तपासले. खाऱ्या शेंगांच्या दोनचार टरफलांखेरीज दुसरें कांहींही पडलें नाहीं. आपणांला दुसऱ्याच्या भानगडी काय करावयाच्या आहेत ?

मरेना तो बाळू ! याला काय सुख म्हणतात ! चिखलांतला किडाही मग सुखी म्हणावयाचा ! इतक्यांत सिनेमाच्या सुरुवातीची घंटा वाजली; दरवाजाचे पडदे खर्रकन् ओढल्याचा आवाज झाला. आंतील दिवे विझले. आंत अंधार झाला असेल दोघे अगदीं बेहद्द–छट्ट् ! आज आपण चांगली संधि घालविली ! बाळूला नेमका पकडला असता ! घरीं जाऊन पैसे घेऊन यावें व त्याच्या नाकावर टिच्चून वरच्या जागेवर बसावें असें वाटलें ! पण तो विचार जागच्या-जागींच दबला. कारण घरीं गेलों कीं, आमच्या खोलीचे दोन–तृतीयांश भागीदार मोफत बोकांडीं बसावयाचे ! काय करावें कांहीं कळेना ! राजाबाई टॉवर वरील घड्याळाच्या लंबकाप्रमाणें मन आंतल्या आंत हेलकावे खात होतें.

सिनेमाच्या कंपाउंडमधून सरळ बाहेर आलों. समोरील पानपट्टीच्या दुकानदारांपुढें शेअर बाजारांतील गुजराथी व्यापाऱ्याच्या बेपर्वाई वृत्तीनें दोन आणे फेंकून चपट्या विड्यांचें अख्खें बंडल व एक काड्याची पेटी विकत घेतली व शेजारील एका बंद झालेल्या दुकानाच्या पायरीवर अंधारांत ठाण मांडून बसलों. तसें कशाला पाहिजे ? एकदां तलास लावावयाचा ठरल्यावर मग काय कोणाची परवा आहे ! उद्यां सकाळची शाळा आहे–उशीर होईल ना ! जाना देव ! माझें धूम्रपान जोरांत सुरू झालें. बाळू बाकी 'लकी' यांत शंका नाहीं ! पूर्वीचें त्याचें आयुष्य काय–आणि आतां काय ?–पण शक्य नाहीं. जगांत असे किती दिवस चालणार ! पापाचा घडा केव्हां ना केव्हां तरी भरलाच पाहिजे. आजपर्यंत या मार्गांनीं गेलेल्यापैकीं कोणाचें चांगलें झालें आहे ? मी 'मुमुक्षु' पत्राच्या भाषेंत विचार करूं लागलों. इतक्यांत विडीचा चटका बसला. दुसरी पेटविली. एका तासांतच पन्नास विड्यांची राख झाली. विडया संपल्या; पण विचार संपले नव्हते. माझ्या 'नॉन स्टॉप' धूम्रपानानें ओंठ अगदीं हुळहुळे झाले होते. काडी ओढून फूटपाथवर पाहिलें. विड्यांच्या थोटकांचा सडा पडला होता. त्यांपैकीं थोडीफार फिरून वापरण्या-इतक्या लांबीचीं दिसत होतीं. मनांत एक अविचार उत्पन्न झाला. इतक्यांत 'काय हरवलें हो ?' म्हणून एक रिकामचौकस प्राणी माझ्या शेजारी वांकून पाहूं लागला. तेव्हां काडी विझवून न बोलतां मी सरळ चालूं लागलों. पन्नास विड्यांत पहिला तास घालविला तसा पन्नासपाऊणशें चकरांत पुढला तास

घालवावा ! फूटपाथवर हमाल वेडेवांकडे झोंपले होते. त्यांच्यावरून हर्डल्स-प्रमाणें उड्या मारीत मी पुढें गेलों. हतभागी जीव ! जगांत काबाडकष्टानें उपजीविका करणाऱ्यांनीं रस्त्यावरून कचऱ्याप्रमाणें लोळावें आणि समाजाच्या उकीरड्यांत लोळणाऱ्या कचरेवजा लोकांनीं वेस्ट एन्डमध्यें मजा माराव्या ! न्याय नाहीं. मला एकंदरींत जगाचाच राग आला. अशा जगाला कांहीं नाहीं नुसते फटके पाहिजेत ! अंदमानमधील निष्ठुर बारी बाबा माझ्या अंगांत संचारला. फरासखान्यांतील पोलिसांची गुर्मी माझ्या मनगटांत फुरफुरूं लागली. पण जाऊं द्या झालें ! चालावयाच्याच या गोष्टी ! फर्ग्यूसन कॉलेज रोडवर फिरावयास जाणाऱ्या पेन्शनरी प्राण्यांच्या थंडाईनें मी म्हणालों. अजून कितीतरी वेळ होता. छे ! अठ्ठावीस वर्षांची उमर कशी घालवली तें कळलें नाहीं आणि आतां दोन तास कसे घालवावेत तें सुचत नाहीं. आश्चर्य आहे ! सँढर्स्ट रोडच्या जंक्शनवरील एका रस्त्याकडे ठेविलेल्या बाकावर जाऊन मी बसलों. डोकें अगदीं सुन्न झालें होतें. कधीं डोळा लागला कोणास ठाऊक ? वेस्ट एन्ड सिनेमा सुटल्याच्या गलक्यानें जागा झालों; आणि आग लागलेल्या घराच्या मालकाच्या वेगानें सिनेमाकडे पळत सुटलों. तों कोंपऱ्यावरच गर्दीत बाळू व त्याची 'मंडळी' दृष्टीस पडली. फिरूनही ते हंसतच होते. त्याच्यां हातांत सिगारेट होती. तिच्या हातांत सिनेमांत फुकट मिळणारा जपानी पंखा होता. माझ्या हृदयांत जागृत झालेला शेरलॉक होम्स स्वस्थ थोडाच बसणार होता ? चटकन् रस्ता ओलांडून मी त्यांच्या मागें झालों. चार पावलें पुढें गेलों नाहीं तोंच रस्त्यानें जाणाऱ्या एका टॅक्सीला बाळूनें ऐटीनें खुणावलें. टॅक्सी थांबली. दोघें आंत जाऊन देखील बसलीं. मोटारच्या मागें जाऊन बसूं का ? पण हा विचार डोक्यांत येण्याच्या आधींच मोटार पसार झाली ! D—d lucky beggar !

लोकमान्यांची प्रेतयात्रा देखील इतकी हळू गेली नसेल इतक्या हलक्या पावलांनीं व जड अंतःकरणानें मी चाळींत परत आलों. दार उघडून दिवा लावला. माझे दोन-तृतीयांश भागीदार एकमेकांशी नव्वद डिग्रीचा कोण करून निजले होते. लाथेनें मीं गादी ढकलली. मोरीच्या भिंतीवरील डेऱ्यांतील उरलेलें पाणी कपानें खरडून प्यालों व गादीवर परत येऊन पडलों. दिवा विझवला. पुष्कळ वेळ झोंप येईना. पुण्यांतील धंदेवाईक वक्त्यांप्रमाणें माझ्या

डोळयांपुढें ‘ आजचे तरुण ’ हा विषय फिरत होता. बी. ए. होऊन आयुष्याचा व्यर्थ नाश मात्र होतो. मनोदेवतेनें शेवटचा निकाल दिला. काय माझें आयुष्य ! ‘ निष्प्रेमाची शेज सोबती । मनिंच्या आशा मनास खाती ।—’ आणि बाळू ? Exquisitely happy ! इतक्यांत भागीदाराची तंगडी माझ्या गळयावर आली. ती जोरानें ढकलून मीं ब्लँकेट तोंडावर ओढून घेतलें व घोरूं लागलों.

४

या गोष्टीला चार दिवस लोटले असतील. एका संध्याकाळीं नेहमींच्या शिरस्त्यास अनुसरून मी चौपाटीच्या उकिरड्यावर लोळत पडलों होतों. आज मात्र खारी शेंग विकत घेतली नव्हती. येणाऱ्या जाणाऱ्याकडे विमनस्क दृष्टीनें पहात, मधून मधून मावळत्या सूर्याची सोनेरी शोभा अवलोकीत व अधींमधीं मलबार हिलवरील हिरव्या झाडींतून डोकावणाऱ्या बंगल्याकडे बघत मी कसा तरी वेळ घालवीत होतों. इतक्यांत मागून “ Hallo, old chum ! ” म्हणून परिचित शब्द कानांवर पडले. अंगावर बर्फाचें पाणी टाकावें त्याप्रमाणें मी खडबडून उठलों. मागें पहातों तों बाळू व त्याची ‘ मंडळी ’ ! पूर्वीपेक्षांही अधिक झोंकांत ! Shameless ! दिवसाढवळ्या देखील हिंडतात वाटतें ? मनांत चटकन् विचार येऊन देखील गेले. मी लिथो प्रेसवर छापलेल्या चित्रा प्रमाणें हंसरा चेहरा करतों तों, बाळू माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, “ अरे ! किती वर्षांनीं भेटलास दोस्त ! माणिक, He is my very old friend बरं का ! इतके दिवस मी मेसोपोटोमियामध्यें होतों त्यामुळें आमची गांठ पडली नव्हती. आतां माझी इथेंच बदली झाली आहे, बरें का ! अरे पण Excuse, let me introduce my wife to you ! नुकतेंच आमचें लग्न झालें !—”

जुहूच्या किनाऱ्यावर येणाऱ्या प्रचंड काळलाटेंत मी गुरफटून गुदमरतों आहें असें वाटलें ! यमपुरींतल्या लांकडी बाहुल्यांच्या पावित्र्यांत मीं बाळूच्या बायकोला नमस्कार केला व वाळूवर पायाच्या आंगठ्यानें कांहींतरी आकृति काढूं लागलों.



# माझा व्यापार

१९१९ चा एप्रिल महिना. युरोपमधील महायुद्ध व माझा कॉलेजमधील अभ्यासक्रम एकसमयावच्छेदेंकरूनच समाप्त झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. चार वर्षांच्या युद्धाच्या धुमश्चक्रीनें थकून गेल्यामुळें दोस्त राष्ट्रें जितकीं हातघाईवर आलीं नसतील तितका विश्वविद्यालयांतील परीक्षांबरोबर सालोसाल कुस्त्या खेळून मी जेरीस आलों होतों. आणि म्हणून बी. ए. च्या परीक्षेंत लिहिलेल्या पेपरांच्या परिणामाबद्दल ( Result ) मनांत चांगलीच धाकधूक असतानांही दीर्घ परिश्रमानंतर मिळालेल्या विश्रांतिसुखाचा आस्वाद निर्वेध-पणानें घेण्याचें मी ठरविलें. आणि दोन चार दिवसांतच मी पुण्याहून एकाद्या मित्राच्या खेडेगांवीं सुट्टींत दीड महिना घालविण्यासाठीं गेलोंही असतों—

पण ! पण आमचे अण्णा—म्हणजे चुलते—असेंच एके दिवशीं मला म्हणाले, " विन्या,—लेका, तूं तर आतां बी. ए. होणार !—"

यावेळीं मी डोळे मिटून मनांतल्या मनांत कुलदेवतेची प्रार्थना केली !

" अशा झोंपा काय घेतो आहेस उभ्यानें ? काल रात्रीं नाटकाला गेला असशील दुसरें काय ?—तर माझं म्हणणें असं कीं विनाकारण दीड दोन महिन्यांची सुट्टी फुकट घालविण्याऐवजीं त्या वानवडीच्या हपिसांत नोकरी केलीस तर शेंदीडशें रुपये तरी तुला मिळतील ! "

" वानवडीचें हपीस ! कुठलें हपीस ? " मीं विचारलें.

" अगदीं बावळट आहेस ! तुला वानवडीचें हपीस ठाऊक नाहीं ? अरे, दोन हजार माणसें पोट भरत असतात तिथें ! लढाईच्या कामासाठीं सरकारनें केवढें हपीस उघडलें आहे ठाऊक आहे तुला ? तो आपला गणपतराव—"

" हो मी रुकार दिला. गणपतराव कोण कोणास ठाऊक ? पण नाहीं

म्हणालों असतों तर अण्णांनीं गणपतरावाच्या बेचाळीस पिढ्यांचा सविस्तर इतिहास सांगितला असता. " बरं मग त्यांचं काय ?—"

" त्या गणपतरावाला साडेपांचशें रुपये पगार मिळतो तिथें! म्हटलं मॅट्रिकदेखील नाहीं तो ! "

" अस्सं ! " अण्णांनीं अपेक्षिल्यापेक्षां अधिक आश्चर्यचकित चेहरा करून मी त्यांच्याकडे बघूं लागलों.

" आणि तो दत्तू—"

" म्हणजे तो आपला हा—! तोच ना ? " मीं दत्तूची माहिती असल्या-बद्दलची खातरजमा केली.

" हो, तोच ! त्याला तीनशें रुपये पगार आहे ! आहेस कुठं ? आपल्या त्या किशीचाचं तो दीर ! "

दत्तू तीनशें रुपयांचें काय करीत असावा याचा मी विचार करूं लागलों.

" त्यानेंच मला काल सांगितलें, " अण्णा म्हणाले, " कीं तुमच्या विन्याला द्या पाठवून. घेतों त्याला चिकटवून ! शंभर रुपये पगार मिळेल चांगला ! "

" शंभर रुपये ! ! " मला खरेंच वाटेना. मला वाटलें अण्णांच्या तोंडांतून एकादें शून्य गडबडीनें जास्ती गेलें कीं काय ?

" म्हणजे, तुला खोटें वाटतें कीं काय ?—आतां तो सद्या—पलीकडल्या घरांतला—"

" म्हणजे तो वर्तमानपत्रें विकत होता तो ? " मीं विचारलें.

" हो, तोच. त्याला देखील दत्तूनें त्या हपीसांत लावून घेतला आहे. त्याला किती पगार आहे ठाऊक आहे ? "

" अडीचशें ? मी भीतभीतच बोललों.

" छट्, इतका नाहीं ! तरीपण त्याला चांगले पन्नास रुपये मिळतात ! तो तर दोन इयत्ता देखील शिकला नाहीं ! पांच रुपये वर्षाचे देखील मिळवि-ण्याची त्याला अक्कल नाहीं ! मग तुला शंभर रुपये काय जास्त झाले काय ! आपल्या आळींतील पांच पंचवीस मंडळी दत्तूनें आतांपर्यंत 'लावून' घेतली आहेत ! "

मला ' दत्तू ' म्हणजे एक अजबच माणूस वाटला. एका मोठ्या बादलींत डिंक व एका हातांत भला मोठा ब्रश घेऊन प्रत्येक आल्यागेल्या माणसाला आपल्या हपीसांत ' चिकटविण्याच्या ' कामांत तो व्यग्र झालेला आहे असें ' दत्तू 'चें रेखाचित्र माझ्या कल्पनेनें रेखाटलें ! आमच्या आळींतील सात आठ विचित्र लोक आपल्या सायकलच्या आडव्या दांड्याला बारकसा फराळाचा डबा बांधून रोज सकाळीं ८–८॥ चे सुमारास आमच्या घरावरून कूच करीत असत. ही मंडळी कोणत्या कामाचा सत्यानाश करण्यासाठीं इतक्या नियमितपणें रोज जात असावी याचें मला पुष्कळ दिवस गूढ होतें. तें त्या दिवशीं उकललें ! अस्सें, ही एकंदरींत ' दत्तू'नें चिकटविलेली मंडळी तर !

अर्थात् शंभर रुपये पगाराची इतक्या सुलभ तऱ्हेनें मिळणारी नोकरी सोडून देऊन बाहेरगांवीं जाण्याइतका मूर्खपणा माझ्या हातून होणें शक्य नव्हतें ! मी अण्णांच्या म्हणण्याला ताबडतोब कबुली दिली. पण हळूंच म्हटलें, " अण्णा, तुमच्या ' दत्तू ' ला मला जास्त पगार द्यायला सांगा अं ! आपल्याला निदान दीडशें तरी मिळायला पाहिजेत नाहीं कां ? "

" दीडशें ठेवलेत तुझ्या बापानें ! गद्धया—"

अण्णा चिडून म्हणाले व आंघोळीला गेले.

\+ + +

दुसरे दिवशीं रविवार होता. तेव्हां सकाळींच अण्णा मला ' दत्तू ' च्या घरीं घेऊन गेले. " चल, तुला आज ' चिकटवून ' च टाकतों ! " अण्णा उंबरठ्याच्या बाहेर पडतां पडतां आधल्या रात्रींचा तोंडांत उरलेला विडा चघळीत म्हणाले. कॉलेजच्या उभ्या चार वर्षांच्या हयातींत एकाही प्रोफेसराच्या दर्शनाला गेलेलें मला आठवत नाहीं ! कॉलेजचा कारकून व पट्टेवाला या दोनच कॉलेजांतील ' अधिकाऱ्या ' शीं वर्गाच्या बाहेर प्रत्यक्ष बोलण्याचा काय तो प्रसंग यायचा ! म्हणून आपल्यापेक्षां वरिष्ठ दर्जाच्या माणसाला आपण घरून उठून भेटायला जातांना जसें चमत्कारिक वाटतें तशाच प्रकारची भावना ' दत्तू ' ला भेटायला जातांना मला वाटत होती. अण्णांच्या एकेरी उल्लेखामुळे ' दत्तू 'चा भाव माझ्या कल्पनासृष्टींत उतरलेला होता तेवढाच काय तो त्याक्षणीं मला विरंगुळा वाटत होता.

कसबा पेठेंतल्या एका अत्यंत गलिच्छ गल्लींतून एक दोन वळणें घेऊन आंत जायचें—इथपर्यंत जायचें कीं पुढें एक खिंडार लागतें आणि आतां वाट पुढें कुठें जाने हें न कळल्यामुळें मनुष्य हतबुद्ध होऊन आजूबाजूला पाहूं लागतो. आणि अशा रीतीनें डोकें खाजवीत आपण वर बघूं लागलों म्हणजे 'पिसा'च्या मनोऱ्याप्रमाणें किंवा पुण्यांतल्या ताबूताप्रमाणें सतरा ठिकाणीं अंगांत लचक भरलेलें जें एक घर आपल्याला प्रथम दिसतें तेंच 'दत्तू'चें घर ! तळमजल्यापासून तों तहत तिसऱ्या मजल्यापर्यंतचा एका बाजूचा भाग अजिबात 'कटाप' करून टाकल्यामुळें, त्या 'अँगल'नें त्या इमल्याचें सौंदर्य बघणारा मनुष्य क्षणभर थक्कच होऊन जात असे ! दुसऱ्या मजल्यावरच्या खुंट्या आणि कोनाडे, त्यांत एका खुंटीला अडकवलेलें फाटकें सूप, एका तुळईला टांगलेलीं चार दोन शिंकीं, तिसऱ्या मजल्याच्या अरुंद त्रिकोणकृति माळ्यावर खूप दाटीवाटीनें सांठवून भरलेल्या 'संसारोपयोगी' गोष्टी ! इ. इ.

या शोभेला साजेल असाच त्या घराचा पुढील भाग होता. दाराच्या भिंतीवर बरेचसें गवत उगवलेलें असून त्यांत कोणाचा तरी फाटका पतंग अडकलेला दिसत होता. दरवाज्यावर काथ्याच्या दोरीला टांगलेला एक नारळ लोंबत होता व त्यावरची सोनेरी बेगड आतां अगदीं काळें किचमिट झालीं होतीं. त्यामुळें त्या घरांत कधींतरी प्राचीन काळीं मंगलकार्य घडलें असावें असें पहाणाराला कदाचित् वाटलें असतें.

आम्हीं त्या दरवाजापर्यंत पोहोंचलों असूं, इतक्यांत आंतून एक इसम बाहेर आला. इसमच होता तो–कारण त्याची शरीरयष्टी उंच व हाडकुळी असून त्याच्या फाजील पिंजारलेल्या मिशा त्याच्या एकंदर शरीराला न शोभण्यासारख्या होत्या. एकंदर पोषाखावरून तो म्युनिसिपालिटींतल्या एकाद्या मुकादमासारखा दिसत होता. त्याच्या हातांत एका काळीं पांढऱ्या रंगाची असावी अशा तर्काला देखील जागा न देणारी अशी सतरा डाग पडलेली एक झोळी होती. यावरून मशारनिल्हे प्राणी मंडईला चालला असावा असें मीं ओळखलें.

"कोण दत्तोपंत ! हः ! हः ! हः !" अण्णांनीं त्याला—किंवा त्यांना अघळपघळ नमस्कार केला. "मंडईत वाटतं ! हः ! हः ! आज स्वतःच अगदीं !"

बुधवार चौकांतून सायकलीवर बसून सिगारेट फुंकीत नेपोलिअन चालल्याचें दृश्य मला कोणी दाखविलें असतें तर मला इतकें आश्चर्य वाटलें नसतें! कोण, हाच ‘दत्तू’ किंवा दत्तोपंत! आणि याला दरमहा रुपये तीनशें! धन्य आहे त्या ब्रिटिश सरकारची आणि त्या मिलिटरी अकाऊंट खात्याची! दत्तोपंताच्या अंगाखांद्यावरच्या एकंदर पोशाखाची (झोळी जमेस धरून) किंमत काढली असती तर ती एक रुपया अकरा आणे तीन पै पेक्षां जास्ती झाली नसती! आणि या माणसाला ती-न-शें-रुपये-पगार!

दत्तोपंतांनीं आपल्या गालावरची चार दिवसांची वाढलेली दाढी खाजवीत आमच्याकडे पाहिलें व किंचित् स्मित केलें! तेवढ्यांत त्यांचा पुढला एक दांत पडलेला आहे व दुसरा हलतो आहे हें मीं बघून घेतलें.

“ हा—आमचा विन्या-विनू!” अण्णा माझ्या दंडाला धरून म्हणाले. “ यंदा बी. ए. ला बसला आहे—सुटेल बहुतेक!” अण्णांच्या ‘सुटेल’ या शब्दाचें मला कौतुक वाटलें; जणूं काय मी एखाद्या सेशन कमिट खटल्यांत अडकलों होतों. मी दत्तोपंताला नमस्कार करण्याच्या भानगडींत न पडतां बावळटासारखा दुसरीकडेच बघूं लागलों.

“ मीं अशासाठीं आणला होता याला—” दत्तोपंताच्या उत्तराची वाट न पहातांच अण्णा फाजील सलगीच्या स्वरांत पुढें म्हणाले, “ म्हटलें, तुमच्याकडे याला चिकटवितां आला तर पहावा—”

“ हं! हं! आलं ध्यानांत!” दत्तोपंत आपल्या मिशांचीं टोकें ओठांच्या एका कडेनें चावीत म्हणाले, “ पण हल्लीं असं आहे त्याचं—”

“ सगळं तुमच्यावर अवलंबून आहे!” अण्णांनीं दत्तोपंतांचें वाक्य पुरें केलें व तोंडावर ओढून ताणून हंसूं आणून ते त्यांच्याकडे बघूं लागले. दत्तोपंतावर त्या आविर्भावाचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं.

“ बरं—उद्यां द्या याला पाठवून तिकडे ऑफिसांतच—” दत्तोपंताना शेवटीं कौल दिला.—“ पण हें पहा—” दत्तोपंत मला उद्देशून हलक्या आवाजांत व जरा अनुनासिक स्वरांत म्हणाले. “ बी. ए. ला बसलों असं सांगूं नका! बी. ए. पास-हं, आलं ध्यानांत!” असें म्हणून दत्तोपंतांनीं अर्थपूर्ण दृष्टीनें मान उडविली!

“ हो—हो—तें आलं सारं ध्यानांत—मी पढवतों त्याला सारं तें!”

असें मी तोंड उघडावयाच्या आंतच अण्णांनीं उत्तर देऊन टाकलें ! " इरसाल दिसतो आहे लेकाचा ! " मी मनांतल्या मनांत पुटपुटलों. दत्तोपंताचा निरोप घेऊन आम्ही परतलों. परत येतांना हा महात्मा तीनशें रुपयांचें काय करीत असावा याविषयीं मी तर्क करीत होतों. बिंबोश्याच्या माळाप्रमाणें हा रुपयाच्या माळा करून फडताळांत टांगून ठेवित तर नसावा ? इतक्यांत अण्णानीं माझ्या दंडावर चापट मारून म्हटलें, विन्या, हा आपल्या किशीचा दीर बरं कां ! "

* * *

दुसरे दिवशीं साडे दहाचे सुमारास 'पाऊण तास' भाड्याची एक सायकल पैदा करून मीं वानवडीचें ऑफीस गांठलें. दशम्यांचा डबा सायकलच्या पुढच्या दांड्याला बांधण्याचें अर्थातच मीं विसरलों नाहीं ! दोन्ही बाजूला व्हरांडे असलेल्या साधारण बैठ्या, पण लांबलचक व कौलारू अशा एकसारख्या एक अशा कितीतरी इमारती त्या ठिकाणीं होत्या. त्या बघून मी क्षणभर बुचकळ्यांत पडलों. कुठें चिकाचे पडदे लोंबत होते तर कुठें मधेंच पत्र्यांचीं पार्टिशनें घातलेलीं दिसत होतीं. आंतमध्यें डोकावून कुठें पहावें तर कागदांच्या व मोठमोठ्या फायलींच्या ओझ्यांनीं वांकलेल्या टेबलांच्या रांगाच रांगा ! भोंवतालीं खुर्च्यांवर कारकून मंडळी बसून कामांत चूर झालेली. कुठें हुश्श नाहीं कीं हश्श नाहीं ! दर चार दोन टेबलांच्या अंतरावर एक एक 'सोजीरकारकून' बसलेला दिसत होता. उंसाच्या शेतांत अधून मधून लावलेल्या एरंडाप्रमाणें काळ्या कारकुनांच्या रांगांतून अधेंमधें बसलेले ते गोरे कारकून दिसत होते. दत्तोपंताला ज्या हपिसांत तीनशें रुपये पगार मिळतो तें ऑफीस कसें असावें या संबंधीं आधीं मनांत रंगविलेलें कल्पनाचित्र सपशेल खोटें ठरलें. दोन चार शिपायांजवळ व कारकुनांजवळ चौकशी करून मीं दत्तोपंतांच्या ऑफिसाचा पत्ता मिळविला. दत्तोपंताचा ऑफिसांतला पोषाख त्यांच्या मंडईस जाण्याच्या 'यूनिफॉर्म'पेक्षां बराच चांगला होता. हें बघून मला समाधान वाटलें. मला पहातांच किंचित् स्मित करून दत्तोपंतांनीं टेबलावरची घंटा वाजवली व आंत शिपाई येतांच त्याला " यांना त्या वरदराजलूकडे ने ! " म्हणून सांगितलें. मी किंचित् साशंक चेहऱ्यानें दत्तोपंतांकडे बघूं लागलों.

" No, you can go with him. He is our man—I have done everything—you go ! "

तेवढ्यांतल्या तेवढ्यांत मी दत्तोपंतांच्या इंग्रजी भाषणशैलीचें कौतुक करीत त्या शिपायाबरोबर गेलों. वरदराजलु हा एक मला भक्कम बुचडा डोक्यामागें असलेला, कपाळावर गोपीचंदनाचा त्रिपुंड्र लावलेला एक लठ्ठ व बुटका असा मद्रप्रांतीय अधिकारी होता.

" कुलकर्णीसाहेबांनीं यांना पाठविलें आहे. " शिपाई म्हणाला.

" Oh–you are Kulkarni's man–yes–you are appointed on ninety rupees–you are B. A.,–no ?–अरे महादु, ए सायबांना त्या अकाउंट सेक्शनमध्यें घेऊन जा, त्या स्मिथ साहेबाच्या टेबलावर—You go Mister, with him ! "

मी जागा आहे कां स्वप्नांत आहे हेंच मला कळेना ! या ऑफिसांत मला येऊन अर्धा तास झाला नाहीं तोंच माझी नव्वद रुपयांवर नेमणूक—अकाऊंट सेक्शनमध्यें–आणि स्मिथ साहेबांच्या टेबलावर ! आणि मला नेमलं तरी कुणी–आणि काय लायकी पाहून ? दत्तोपंत म्हणजे खरोखरच मला अजब माणूस वाटूं लागला !

" काय भयंकर power आहे या माणसाच्या हातांत ! " मी पुटपुटलों.

" बरोबर आहे, किशीचाच दीर तो—! "

* * *

दोनचार इमारती ओलांडून मला माझ्या ऑफिसांत त्या शिपायानें आणून सुपूर्द केलें. वाटेंत कारकुनांच्या रांगांमधून जात असतांना गांवांतील कितीतरी ओळखीचे चेहरे दृष्टीस पडले. " अरे, हा कसा इथें ! " हे उद्गार मी मिनिटांच्या आंत पांच पन्नास वेळां तरी स्वतःशीं काढले असतील ! वर्तमानपत्रें विकणारा सद्या—म्हणजे ज्याला ' दत्तू ' नें पन्नास रुपयांवर चिटकवून घेतलें होतें असें अण्णांनीं मला सांगितलें होतें, तो एका कोपऱ्यांत लिफाफे चिकटवीत बसलेला पाहून मी अगदीं ' चाट ' च झालों ! माझ्याबरोबर इंग्रजी दुसरींत असलेला तदनंतर शाळा सोडून घरीं बसलेला ' नन्हू टांकसाळे ' नांवाचा एक इसम गंभीर चेहरा करून एका टेबलाशीं कसलेसें लिखाण करीत बसलेला

बघून तर मी जवळजवळ मूर्च्छित पडण्याच्या बेतांत आलों होतों. इतक्या वर्षांनें मीं त्याला पाहिला! त्याच्या ओठांवर व गालांवर झालेल्या फेरफारापेक्षां त्याच्यांत अधिक फेरफार झालेला मला दिसला नाहीं. जातां जातां हलकेंच ' काय नऱ्ह्या! ' असें पुटपुटण्याचा देखील माझा विचार होता. पण तो मोह कष्टानें आवरला.

ज्या ' स्मिथ ' साहेबाच्या टेबलावर माझी नेमणूक झाली होती तो भलाभक्कम लालबुंद दिसणारा असा एक सोल्जर होता. मी तेथें जातांच मला त्यानें एकवेळ पायापासून डोक्यापर्यंत नीट न्याहाळलें व माझ्याशीं कांहीं न बोलतां मला खुर्चीवर बसावयास त्यानें हातानें खुणावलें आणि एक दोन फूट रुंदीचें व तीन फूट लांबीचें खूप जाडजूड पुस्तक माझ्यापुढें सारून तोंडांतल्या तोंडांत ' Do that—! ' असें त्यानें मला सांगितलें. पुष्कळ वेळ तो काय सांगतो आहे हेंच मुळीं माझ्या ध्यानांत येईना. मी बावळट चेहऱ्यानें त्याच्याकडे बघूं लागलों व थोड्या वेळानें त्याच्या गोंदलेल्या हाताकडे बघूं लागलों तसा तो एकदम चिडून माझ्यावर ओरडला, " Ay! do that! " मी अगदीं गांगरून गेलों व माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला. तसा शेजारच्या एक गांवठी काळा कारकून माझ्या मदतीला धांवला व त्यानें मला चटकन् माझें काम समजावून सांगितलें. त्या लठ्ठ काळ्या पुठ्याच्या पुस्तकांत एका रेजिमेंट-मधल्या शिपायांचीं नांवें व त्या शिपायांच्या पगाराचा हिशेब लिहिलेला होता; त्यावरून एका निराळ्या जाड व सुट्ट्या कागदावर प्रत्येक शिपायांच्या पगाराचा हिशेब तयार करावयाचा हें काम माझ्याकडे आलें होतें. काम अगदींच सोपें होतें हें मी एक अर्ध्या तासांत ओळखलें. तोंपर्यंत माझ्या अंगावर आलेला घामही विरून गेला होता. दोन वाजेपर्यंत मीं पंधरावीस कागद भरून तयार केले असतील. मधल्या सुट्टींत कारकून मंडळीच्या टोळ्याच्या टोळ्या बाहेर पडल्या तसा मीही त्यांत बाहेर पडलों. " काय, आलांत ना तुम्हीं आजपासून! " असें पांचपंचवीस मंडळींनीं मला हंसून विचारलें असेल " कोणतं काम आलं तुमच्याकडे! L.P.C. चें कां! " एकानें विचारलें. " L.P.C. म्हणजे?" मीं उलट विचारलें, " वा म्हणजे L.P.C. तुम्हाला ठाऊक नाहीं? अहो, Last Pay Certificate " तो म्हणाला. " हो, तेंच काम आहे

माझ्याकडे !" माझ्या डोक्यांत प्रकाश पडून मी म्हणालों, "काय स्टार्ट मिळाला तुम्हांला !" दुसऱ्यानें 'सरळ' विचारलें. मी म्हणालों, "Ninety." "काय, Ninetyच ? बी. ए. ना तुम्हीं ! हं, तुम्ही त्या वरदराजलूकडे गेलां असाल ! He is a बदमाष ! तुम्हीं त्या डिकास्टाकडे गेलां असतां तर त्यानीं तुम्हांला Hundred and ten दिले असते !" आपला वीस रुपयांचा तोटा झाला हें ध्यानीं येतांच मला थोडीशी हळहळच वाटली ! पण म्हटलं जाऊं द्या. फार आशा नसावी.

डबा सोडून फराळाला कुठें बसावें या विचारांत मी होतों; तोंच देशमुख नांवाच्या आमच्याच सेक्शनमधील एका कारकून दोस्तानें माझा दंड धरून म्हटलें, "जोशी, चला आपण त्या अय्याच्या हॉटेलमधें जाऊं !" मला बोध होईना. मी डब्याकडे बोट दाखविलें. "चला हो राहूंद्या तुमचा डबा !" असें म्हणून तो मला घेऊनसुद्धां गेला. अय्याचें हॉटेल हें एका पत्र्याच्या लहानशा खोलीत होतें. आंतमध्यें कारकुनांची नुसती झुंबड पडली होती. कुणी खाराबुंदी खात होते-कुणी दहिंवडा चापीत होते-! सगळाच मद्राशी प्रकार होता खाण्याचा तो; देशमुखांनीं दोन दहिवडे मागवले. इतकें रुचकर खाद्य जन्मांत मीं कधीं खाल्लें नसेल ! माझ्या आधाशी चेहऱ्याकडे बघून, पण माझ्या रुकाराची वाट न पहातां, देशमुखांनीं आणखी दोन दहिवडे मागविले. माझ्या खिशांत तर पैसुद्धां नव्हती. मी देशमुखाला हळूंच सांगितलेंसुद्धां तसें "राहूं द्या हो ! तुमचा काय संबंध पैसे देण्याचा !" रागाचा आविर्भाव चेहेऱ्यावर आणून देशमुख म्हणाला. देशमुखाच्या या औदार्यानें मी अगदीं गारच झालों. यथास्थित खाणें होतांच आम्ही हात धुण्यासाठीं म्हणून बाहेरच्या तोटीवर आलों; तसें देशमुखानें आपले हात धोतरालाच पुसून ऑफीसच्या अनुरोधानें लांब लांब टांगा टाकीत कूच केलें ! मी कावराबावरा होऊन त्याच्या मागें धांवत गेलों. "देशमुख, अहो पैसे द्यायचे राहिले ना !" मी ओरडून म्हणालों; तसें देशमुखानें मोठमोठाले डोळे करून मला गप्प बसावयाला सांगितलें.

"म्हणजे ?" मी म्हणालों.

"तुम्ही नवीन आहांत ! तुम्हांला कळायच्या नाहींत या भानगडी ! पैसे ठेवलेत त्याच्या बापानें !" देशमुख मिस्कीलपणें हंसत उद्गारला. "कुणाला

सांगू नका अं हें." थोड्या वेळानें देशमुखांनीं मला हलकेंच सूचना दिली. कुणी विचारलं तर म्हणावं आमचं खातं आहे तिथं म्हणून!"

दुपारीं पुन्हां मीं माझ्या कामास सुरवात केली. तीन साडेतीनच्या सुमारास सर्व सोल्जर क्लार्क काम संपवून निघून गेले. ते जातांच आमच्या विभागाचें स्वरूप एकदम पालटलें. सगळे हिंदी कारकून आपल्या खुर्च्या सोडून सैरावैरा इकडूनतिकडे हिंडूं लागले. कुणी टेबलावर तंगड्या पसरून सिगारेट फुंकूं लागले तर कुणी आपल्या चंच्या सोडून प्रशस्तपणें पानतमाखूं खाण्याची तयारी करूं लागले. कांहीं कांहीं टेबलाभोंवतीं तर कारकून मंडळीच्या टोळ्या जमा झाल्या व गप्पांना आणि हंशाला जसा काय ऊतच आला!

राहूं द्या हो तुमचं काम!" देशमुखानें माझें पुस्तक हातांतून ओढून घेतलें व मिटवलें देखील!

"म्हणजे, आहो तो स्मिथ ओरडेल ना माझ्या अंगावर उद्यां!" मी भीत भीत म्हणालों.

"तुम्हीं नवीन आहांत जोशी! इतकं काम कराल तर मरून जाल पटकन्! रोज दहा L.P.C. झाली म्हणजे बस्! महा मठ्ठ आहेत हे सोल्जर! यांना काय कळतंय! हळूं हळूं कळतील तुम्हांला या साऱ्या ट्रिक्स" असें म्हणून देशमुखानीं स्मिथच्या टेबलांतील खण उघडला व त्यांतून 'सिझर्स' सिगारेटचें एक पाकीट काढून त्यांतील एक सिगारेट आपल्या ओठांत घातली व दुसरी माझ्या पुढें केली.

"म्हणजे-अहो, तो स्मिथ उद्यां—" मी घाबरून म्हणालों.

"घ्या हो! तुम्हीं तरी म्हणजे"-देशमुख सिगारेट पेटवित म्हणाला.

* * *

चार पांच दिवसांत मला ऑफिसच्या कार्यक्रमाची चांगली माहिती झाली. जवळ जवळ मी त्या कामीं अगदीं रूळलोंच असें म्हणायला हरकत नाहीं. रोज सकाळीं डबा घेऊन ८॥ वाजतां घरून निघायचं, दीड तास रप रप करीत वानवडी गांठायची (कारण, रोज भाड्यानें सायकल घेणें शक्यच नव्हतें!) साडेदहा ते दोनपर्यंत आठदहा L. P. C. कशी तरी पुरीं करायचीं, मधल्या सुट्टींत अय्याच्या हॉटेलमध्यें जाऊन दहिवडा चापायचा

व पैसे न देतां प्रतिष्ठितपणें गर्दीतून बाहेर सटकायचें, दुपारीं तीन वाजतां सोल्जर कारकून गेले कीं टेबलावर पाय पसरून स्मिथ साहेबांच्या ठरलेल्या सिगारेटी फुंकायच्या–! दररोज हाच कार्यक्रम ! कांहीं बदल नाहीं यांत ! आठ दिवसाच्या आंतच मी एकाद्या मुरलेल्या कारकुनाप्रमाणें त्या ऑफिसांत मिरवायला लागलों.

एक शनिवारीं देशमुख माझ्या टेबलाजवळ आला. शनिवार असल्यामुळें सोल्जर लोक लौकरच निघून गेले होते.

" जोशी, आपल्याला एक idea सुचली आहे ! खूष व्हाल तुम्हीं ऐकून !" देशमुख हलकेंच म्हणाला. मला कल्पनाच होई ना ! कसली idea काढली आहे यानें ? अय्याचें हॉटेल लुटण्याचा विचार तर केला नाहीं !

" हें पहा, जोशी, तुम्हाला कांहीं Business करायचा आहे का ? अहो, या कारकुनीमध्यें काय मिळायचंय, ८० अन् ९० ! त्यांनीं काय कात व्हायचाय ! "

" म्हणजे, ही नोकरी सोडायला सांगतां काय तुम्हीं मला ! " मी म्हणालों.

" नाहीं हो, नीट ऐका तर खरें ! " देशमुख म्हणाला, " इथल्या इथं राहून **Business** करायचा, अशी ही idea आहे ! मीं तुम्हांलाच म्हणून सांगतों. कां तुम्हांला, तर तुमचा आमचा स्वभाव जमण्यासारखा आहे म्हणून ! आजपर्यंत मी कोणाला ब्र देखील बोललों नाहीं याबद्दल ! "

" सांगा तर खरं काय Business काढला आहेत तुम्हीं ! "

" असं बोला नीट ! चला, इथं नको, आपण बाहेरच त्या झाडाखालीं जाऊं; म्हणजे कुणी ऐकायचं नाहीं ! "

असें म्हणून आम्हीं बाहेर गेलों. विषयाचें महत्त्व माझ्या मनावर पटवण्यासाठीं म्हणूनच कीं काय देशमुखानें हलक्या आवाजांत व गंभीर चेहऱ्यानें आपली योजना मला सांगण्यास सुरवात केली.

" हें पहा जोशी, business ही एक प्रकारची tact आहे. याला दृष्टि लागते, आणि यांत risk ही असतं फार. Risk घेतल्याशिवाय gain ही होत नाहीं. पण माझ्या या योजनेंत risk तर मुळींच नाहीं आणि gain म्हणाल तर three hundred per cent ! हसूं नका. थट्टा नाहीं. असें तें पहा. रोज या ठिकाणीं आपल्या ऑफीसांतले सोल्जर लोक मधल्या सुट्टींत

म्हणा किंवा सकाळीं म्हणा, फळें घेऊन खातात तुम्हीं पहात आहांत ना? हीं फळें काय किंमतीला विकलीं जातात इथें याची कधीं चौकशी केली आहे तुम्हीं? विचार करा! एक आण्याला मंडईत मिळणारें संत्रें इथें चार आण्याला विकलें जातें. दोन पैशाचें केळें दोन आण्याला इथें मिळतें. काय प्रॉफिट आहे कां चेष्टा आहे! एक रुपयाच्या भांडवलावर चकचकीत तीन रुपये फायदा! मिस्टर जोशी, विचार करा—तुम्हीं ऐंशी अन् नव्वद करीत बसाल इथं जन्मभर!—तो मुसलमान फळवाला तिकडे मिनिटा मिनिटाला खोऱ्यानें पैसा ओढतो आहे—आहांत कुठें?"

"मग आपण काय करावं म्हणतां?—" देशमुखाकडे आदरानें पहात मीं एकाद्या अजाण बालकाच्या आविर्भावानें विचारलें.

"करावं काय? अहो विचारतां काय? येत्या सोमवारपासून आपण इथें आपला स्टॉल उघडायचा मेहेरबान! तुम्हीं आणि मी पार्टनर! मेसर्स जोशी ॲन्ड देशमुख! दोघांचे दोन दोन रुपये भांडवल. रोज संध्याकाळीं खणखणीत बारा रुपये मोजून घ्यायचे—त्यांतला एक रुपया विक्री करणाऱ्या माणसाला द्यायचा—त्यासाठीं एक महाराचा पोर देखील मीं पाहून ठेवला आहे केव्हां-पासून! म्हणजे रोज तुमच्या आणि आमच्या खिशांत—वरचे आठ आणे सोडा पाहिजे तर—बंदे पांच रुपये पडणार! कां हंसलांत? Mister, याला म्हणतात idea! म्हणजे चार रविवार वजा करून २६ दिवसांचे १३० रुपये—नाहीं मी म्हणतों सव्वाशें धरा; एवढी प्राप्ति अगदीं बसल्या बसल्या, एवढंसं बोट न हालवतां! आणि सुरुवात सारी दोन रुपये भांडवलावर! बोला आतां. Business आहे कीं नाहीं हा!"

देशमुखाची अपूर्व बुद्धिमत्ता पाहून मी अगदीं थक्क झालों. एकादी सोन्याची खाण सांपडावी तसा मला आनंद झाला व मी क्षणमात्र हतबुद्धच झालों. पगाराचे नव्वद आणि हे सवाशें म्हणजे दोनशें पंधरा! एका महिन्याच्या आंत इतकी प्राप्ति होणार! दत्तूला काय तीनशेंच मिळतात! ऊंः! पुढल्या महिन्यांत आणखी भांडवल घातलं तर प्राप्तीचा आंकडा धाडकन् पांचशेंवर जायचा! शंकाच नाहीं! आतां बी. ए. झालों तरी काय परवा आहे! बाकी अण्णांना यांतलं कांहींच सांगायचं नाहीं—दोन तीन वर्षांत सात आठ हजार रुपये जमवायचे आणि सरळ बॅरिस्टर होण्यासाठीं

इंग्लंडला कूच करावयाचें—लोक अगदीं ठणाणा करतील—या लेकानें कुठून पैसे आणले म्हणून—!

" पण काय हो देशमुख ! " एक विचार माझ्या मनांत आला, " आतांपर्यंत ही कल्पना कोणाच्या डोक्यांत आली नाहीं हें कसें ? "

" Business instinct कुठें आहे आपल्या महाराष्ट्रीय लोकांना ? कारकुनी करण्यांतच यांची अक्कल खर्च व्हायची सारी ! याला डोकं लागतं म्हटलं माझ्यासारखं ! तुम्ही बघा तर खरं ! We shall work wonders here ! आतांपर्यंत जें कोणाला सुचलें नाहीं तें आपल्याला सुचलें म्हणजे त्यांत कांहींच अर्थ नसला पाहिजे हें False Logic आहे ! व्यापारांत हें त्रैराशिक मुळींच चालत नाहीं ! "

देशमुखानें मला सर्व बाबतींत अगदीं निरुत्तरच करून टाकलें. " बरं मग, आतां सोमवारीं काय करायचं म्हणतां ? " मीं विचारलें.

" खरं पाहिलं तर यामध्यें मी तुम्हांला कांहीं सुद्धां तोशीस पडूं देणार नाहीं. सर्व जबाबदारी माझ्यावर आहे. मी माल खरेदी करणार, इथपर्यंत माल आणणार, इथं तो विकायची व्यवस्था करणार—सर्व कांहीं कामें मी स्वतः करणार ! "

" हें पहा, असें कांहीं असेल तर आपण नाहीं यामध्यें पडत. म्हणजे तुम्हीं सारे काम करायचें आणि आम्हीं आयतें बसून खायचें—" मी रागाचें उसनें अवसान आणून म्हणालों.

अहो, तसं नाहीं जोशी, Don't you see that I want to train you ? एका महिन्यांत तुम्ही माझं काम पाहून तयार झालांत म्हणजे सगळी जबाबदारी मी हळूहळू तुमच्याकडे देणार ! तसं असतं तर मी एकट्यानेंच नसता का हा Business सुरू केला ! पण आपल्याला स्वतःला एकट्यापुरतें कांहीं करायचं नाहीं ! त्यांत pleasure च नाहीं मुळीं ! Co-operation हें business चें पहिलें तत्त्व आहे. तुमचा स्वभाव जमला म्हणून मी या भानगडींत पडलों ! "

" पण एक आहे बुवा, सुरवातीला मला ते दोन रुपये भांडवल देतां यायचं नाहीं ! " मी ओशाळा चेहरा करून खिसे चांचपीत म्हणालों, " माझा पगार झाला म्हणजे—"

" Mr. Joshi, you haven't understood me! तुम्ही माझा स्वभावच ओळखला नाहींत अजून. अहो, तुमचें भांडवल देखील मी घालणार! दोन रुपयांची काय पर्वा हो? स्वभाव पटला तेथें पैशाची काय किंमत? मात्र हा सारा Business तुमच्या नांवानें चालायचा! मला स्वतःला पुढें होणें मुळींच आवडत नाहीं! I care more for friendship! देशमुख सिगारेट पेटवीत म्हणाला.

" बरं बुवा, घाला आमचं नांव. तुम्ही काम करून आम्हांला फुकटचं नांव मिळत असलं तर बिघडतं आहे काय आमचं?" मी हंसत हंसत म्हणालों.

सोमवार कधीं उजाडतो आहे असं मला झालें. रविवारचा दिवस मी इंग्लंडला जाण्यासंबंधींची माहिती गोळा करण्यांत घालविला. अण्णांना मीं यांतला सुगावा लागूं द्यावयाचा नाहीं असें ठरविलें होतें, तरी आईच्या कानावर मीं कांहीं थोडीशी हकीकत अस्पष्ट स्वरूपांत घातलीच. सोमवारीं सकाळीं उठल्यापासून तर माझें कशाकडे लक्षच लागेना; साडेआठ कधीं वाजताहेत असें होऊन गेलें होतें मला. पाऊण आणा तासाप्रमाणें सायकल घेतली! आणि ऑफिसला जातांना डबा घ्यायला तर अजिबातच विसरलों!

मी यावयाच्या आधींच देशमुख ऑफीसांत आलेला होता. आमच्या इमारतीपासून एका फर्लांगाच्या अंतरावर एक पिंपरीचें झाड होतें. तेथें आमच्या स्टॉलची योजना देशमुखानें केलेली होती. स्टॉल म्हणजे काय— तर एका देवदारी खोक्यावर तांबडे पांढरे पातळ कागद घालून त्यावर ठेवलेल्या फळांच्या दोन पाट्या एवढेंच! विक्रीसाठीं श्रीपती नांवाच्या एका महार बटलराच्या मुलाची नेमणूक देशमुखानें केलेली होती. मालकाच्या ऐटीनें आम्ही स्टॉलची एकदां पहाणी करून आलों.

" श्रीपती, " मी म्हणालों " उधार बिधार द्यायचं नाहीं अं कोणाला!"

" छे, छे! इथं उधारीची बातच नाहीं!" देशमुख म्हणाला, " श्रीपती, ही मोड असूं दे तुझ्याजवळ अधेलीची. "

ऑफीस सुरूं होईपर्यंत आम्ही आमच्या स्टॉलच्या आजुबाजूला रेंगाळत होतों. साडेदहा वाजतां आम्ही आपापल्या खुर्च्यांवर जाऊन बसलों. पण लक्ष कुठें होतें कामाकडे माझें! खुर्चीवरून बसल्या बसल्या मी मधून मधून स्टॉलकडे नजर टाकीत होतों. दोन सोल्जर गिऱ्हाईकें फळें विकत घेत आहेत

हें बघून माझा आनंद अनावर झाला! त्यामुळें माझें एक L. P. C. खराब देखील झालें! अर्ध्या तासानें कांहींतरीं निमित्त काढून मी स्टॉलवर एक चक्कर मारून आलों व श्रीपतीचा गल्ला तपासला. अर्ध्या तासांत २१ रुपयांची विक्री झालेली होती. मी तसाच धांवत ऑफीसांत आलों व माझ्या खुर्चीवरून देशमुखाला सव्वा दोन आंकड्याची खूण देखील केली बोटांनीं. स्मिथसाहेब तर माझ्याकडे बघून कांहींसें रागानें पुटपुटला देखील!

आणखी दहा पंधरा मिनिटें गेलीं असतील! मी दुसरें L. P. C. कुठें पुरें करतों आहें तोंच आमच्या स्टॉलच्या बाजूकडून गलका झाल्याचा माझ्या कानीं आला. मी वळून पाहतों तों काय? दहाबारा मंडळी श्रीपतीच्या भोंवतीं जमलेली आहेत आणि एक लठ्ठ मुसलमान त्याला जोरजोरानें मारीत आहे! आणि श्रीपती रडत ओरडत आमच्या ऑफीसच्या बाजूकडे बोट दाखवित आहे! हा देखावा बघून माझें धाबेंच दणाणलें! स्मिथसाहेब काय म्हणेल याची परवा न करतां मी उठून देशमुखाकडे गेलों व "There's some danger!" असें कुजबुजलों. "You go and see; Don't be afraid!" असें मला देशमुखानें दांत खाऊन सांगितलें. आतां काय करावें हें मला कळेना! नाहीं तरी श्रीपती माझा पत्ता काढीत ऑफीसमध्यें येणारच! मग आपणच होऊन पुढें गेलों आणि त्या बिचाऱ्याचा मार वांचवला तर काय बिघडलं! असें म्हणून व मनाचा हिय्या करून मी मोठ्या धाडसानें बाहेर पडलों व सरळ त्या ठिकाणीं गेलों. मला पहातांच श्रीपती माझ्याकडे बोट दाखवून ओरडला, "ते पहा मालक आलेत— त्यांनाच विचारा–मला का मारतां?"

"Yes Yes हम् मालक है! Why are you beatirg him!" आयुष्यांत इतक्या जोरानें उच्चारलेलें तें पहिलेंच वाक्य होतें माझें!

श्रीपतीचा हात सोडून आपले लाल डोळे गरगर फिरवीत तो मुसलमान माझ्याकडे आला; "ऐसा, तुम् मालिक है! चलो हमारे साथ क्वार्टरमास्टरके सामने! इदर माल बेचता है तुम्?"

"म्हणजे–मग–What is wrong?" माझ्या नखशिखांत घाम दरदरला होता, "And who are you to-to-ask us?

"Who am I?" तो मुसलमान स्वच्छ इंग्रजींत म्हणाला, "Come

to the quarter and I will show you. I am the military contractor here! मिस्टर, इथं फळं विकायचा अधिकार नाय कोणालाबी ! अरे अब्दुल–" एका नोकराला उद्देशून तो म्हणाला, "उठाव ओ सब फ्रूट–अपने स्टॉलपर लेके चलो! Come on mister, with me!"

मी त्याला कांहीं बोलायच्या आधींच त्यानें माझ्या दंडाला धरून फरफर ओढीत मला क्वार्टरमास्तरच्या तंबूत नेऊन हजर केलें. तिकडे श्रीपतीचें आणि आमच्या स्टॉलचें काय झालें याचा विचार करावयास देखील मला त्यानें वेळ दिला नाहीं. क्वार्टरमास्तर आपल्या तंबूत बीअर पीत बसलेला होता व त्याचा आधींच लाल झालेला चेहरा अधिकच बेफाम झालेला दिसत होता. कॉंट्रक्टरनें एकंदर प्रकरण त्याच्या कानावर घालतांच तो असा उसळून आला माझ्यावर म्हणतां! मी एकदम डोळेच मिटून घेतले. इंग्रजी भाषेंतल्या पांच पंचवीस शिव्या ऐकायला मिळाल्या त्यावेळीं मला! मात्र त्याचा उच्चार अस्पष्ट रीतीनें झाला असल्यानें त्याचा अर्थ माझ्या ध्यानीं आला नाहीं एवढी मेहेरबानीच झाली म्हणायची! "Sir–Sir!" या दोन शब्दाखेरीज माझ्या तोंडून दुसरा एकही शब्द फुटला नाहीं. क्वार्टरमास्तरनें एका कागदावर कांहीं तरी पेन्सिलीनें भरकटलें व तो कागद आपल्या पट्टेवाल्याला देऊन तो म्हणाला, "ओ आदमीकु बडासाब के पास लेके जाव्!"

कॉर्टर मास्तरच्या तंबूतून आमची मिरवणूक जी निघाली ती 'बडा साब' च्या ऑफिसापर्यंत! त्यावेळीं मला ब्रह्मांड आठवलें. कुठून हा नसता 'अव्यापारेषु व्यापार' केला कुणाला ठाऊक! तो देशमुख मेला न् त्याचा Business खड्यांत गेला! सारें करून सवरून तो आपला नामानिराळाच! आणि फुकटचा खोडा माझ्या गळ्यांत अडकवला!

"बडा साब" हें प्रकरण क्वार्टरमास्टरपेक्षांही फार भयंकर होतें. एक सहा फूट उंचीचा भला दांडगा व क्रूर चेहऱ्याचा साहेब लष्करी पोशाख घालून एका खुर्चीवर बसला होता. त्याच्या छातीवर तांबड्या निळ्या फिती व दोन चार बिल्ले लोंबत होते. क्वार्टरमास्टरची चिठ्ठी वाचून त्यानें आपल्या 'मानोंकल' मधून माझ्याकडे तीक्ष्ण नजरेनें पाहिलें.

"You are a clerk here! Isn't it?" साहेबांनीं अगदीं

हलक्या पण कठोर आवाजांत विचारलें; माझ्या अंगावर कांटा उभा राहिला.

" होय—" Yes–Sir ! "

" What's your name ? "

" V. S. Joshi, sir ! "

" What section you are working in ? " साहेबानें विचारलें.

" Account section sir,—L. P. C. I do, sir ! "

" V. S. Joshi, you are an idiot ! " साहेब अगदीं करड्या आवाजांत म्हणाले, " and a fool; You are clerk here. You have no right to sell anything in the military erea! You have made yourself liable for punishment by transgressing the military laws ! "

" But sir—! " आतां हा साहेब मला फांशीची शिक्षा देतो आहे कां काळ्या पाण्यावर पाठवितो आहे तेंच मला कळेना !

" Shut up ! As you are a new clerk I treat your offence leniently ! You are dismissed from this moment. साहेबानें कांहीं मजकूर एका कागदावर लिहिला देखील !

" But Sir-Sir–! " माझा गळा दाटून आला. डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले व कांहीं दिसेनासें झालें !

" Get out ! " साहेब शांतपणें म्हणाला. पट्टेवाल्यानें मला दंडाला धरून बाहेर काढलें. पुढें काय झालें हें मला आठवत नाहीं !

* * *

त्या रात्रीं मी घरांत कोणाला न कळवितां माझ्या मित्राच्या खेडेगांवीं निघून गेलों. मी फिट आल्यासारखा एकाएकीं नोकरी सोडून चालता झालों हें पाहून अण्णानीं अगदीं घर डोक्यावर घेतलें असें पुढें मला आई कडून कळलें !

" हीं पोरं म्हणजे अशीं ! यांना स्वतःच्या अकला नाहींत ते नाहींत पण दुसऱ्याचंही कांहीं ऐकायला नको ! नोकरी लावतांना काय कष्ट पडले ते मला ठाऊक कीं दत्तूला ठाऊक ! नव्वद रुपये महिना हल्लींच्या दिवसांत म्हणजे

काय यांना परसांतला भाजीपाला वाटतो काय? आतां त्या दत्तूला तोंड दाखवायची तरी सोय आहे कां आणि तो आपल्या किशीचा दीर-!" अशी एकसारखी अण्णांची बडबड महिनाभर चालूं होती.

दोन चार महिन्यानें देशमुख मला सहज रस्त्यानें जातांना भेटला. तो कांहीं फारसा माझ्याशीं बोलला नाहीं! एवढें म्हणाला, "अहो Bisiness म्हटला म्हणजे त्यांत risk आलंच! हा सारा नशिबाचा भाग आहे! आपल्या महाराष्ट्रीय लोकांना मुळीं risk च घ्यायला नको! चालायचंच हें!" देशमूखाचें व्यापारी तत्त्वज्ञान ऐकून मी खिन्नपणें हसलों व मान खालीं घालून चालता झालों.

मी ऑफीसांत सारे पंधरा सोळा दिवसच काम केलं असेल! अर्थात् डिसमिस झाल्यामुळें ऑफीसमध्यें पगार घ्यायला जायचें मला तोंडच नव्हतें. तथापि त्या महिन्याचा सबंध पगार माझ्या नांवापुढें सही करून कोणी तरी घेतल्याचें मला पुढें सहज एका ऑफिसांतल्या माणसाकडून कळलें!



# पुणेरी टांगेवाला

तुळशीबागेंतून बाहेर पडणाऱ्या भाविकाला एखादे वेळीं आंधळ्या भिकाऱ्यांचा ' गार्ड ऑफ ऑनर ' मिळावयाचा नाहीं, सकाळच्या भाजी-खरेदीस निघालेल्या एखाद्या झोळीकराला लोंचट पाटीवाल्यांचा हल्ला चुकवून मंडईतून सहीसलामत निसटतां येईल, नव्या पुलावर ' जिवाची मुंबई ' करावयास गेलेल्या हौशी जिवाला ' बालन् खिरे ' वाल्यांच्या कचाटयांत न सांपडतां निवान्त बांकावर ' झोपतां ' येईल, नगरवाचनमंदिराच्या ऐन बिनीला सांजसकाळ ठिय्या देऊन बसलेल्या म्हाताऱ्या मेंबरांच्या नजरेच्या टापूंत न सांपडतां एखाद्या खादीवान् तरुणाला आंत शिरतां येईल, ' फर्ग्युसन कॉलेज ' रस्त्यावरून सायंकाळीं जाणाऱ्या एखाद्या ' बाजिंद्या ' तरुणीला ' फिरावयास ' आलेल्या आबालवृद्धांच्या मानांना फारसा व्यायाम न देतां मार्गस्थ होतां येईल, नवीन रचलेल्या कवितेचे कपटे खिशांत घालून रसिकाच्या शोधार्थ हिंडणाऱ्या काकदृष्टि कवीला झुकांडी देऊन एखाद्या ' समानधर्म्या ' ला पसार होतां येईल पण—पण बुधवार चौकाच्या प्रान्तांत पाऊल टाकणारा कोठलाही दुर्दैवी प्राणी टांगेवाल्यांच्या गिधाडी तडाख्यांत सांपडल्याशिवाय कालत्रयींही रहाणार नाहीं. गालावर उगवलेल्या चारदोन खुंटांचा आधार असल्याशिवाय न्हावीदेखील कोणाशीं आपलेपणाच्या सलगीनें बोलण्याचें धाडस करीत नाहीं; वहाणेची एखादी वादी तुटून पाय ठेंचाळू लागल्याशिवाय चांभारदेखील आपल्या चौकशीचा मोर्चा आपल्या पायाकडे वळवीत नाहीं; पण टांगेवाल्याच्या मेहेरनजरेचा विषय होण्यास कोठल्याही विशिष्ट परिस्थितीची आवश्यकता असावी लागते असें मुळींच नाहीं. टांगेवाल्याच्या मनांत आपल्याविषयीं प्रेमाचें भरतें यावयास आपल्या खांद्यावर अगर हातांत एखादी बॅग इतकें भांडवल तरी असलेंच पाहिजे अशी मुळींच अट

नाहीं. हातांत बरेंच जडजोखीम घेऊन चाललेलें कूळ टांगेवाल्याच्या नक्की हातांतलेंच असतें; पण हात हालवीत जाणारें सडें गिऱ्हाईकही टांगेवाल्याला "एका स्वारी'चा ऐवज सहज होऊं शकतें. सायकलवरून जाणाऱ्या व मोटारींत बसणाऱ्या लोकांखेरीज प्रत्येक प्राण्याला टांग्याची आवश्यकता असते. अशी टांगेवाल्यांची प्रामाणिक समजूत असते. 'साहेब, बुटाला पॉलिस' म्हणून कोठलेंही रस्त्यावरील उनाड कारटें कोणालाही हटकूं शकतें, तद्वत् 'साहेब, टांगा' म्हणून कारण नसतांना कोणालाहि टांगेवाला विचारून थांबवूं शकतो. श्राद्धाचे पिंड नदीवर टाकावयास जाणाऱ्या एका सोंवळ्या भटजीला व परटाच्या कपड्यांचें ओझें पाठीवर घेऊन जाणाऱ्या बैलाला टांगा हवा असल्याबद्दलचा सवाल एका टांगेवाल्यानें केला असल्याचें आमच्या ऐकिवांत आहे.

बुधवार चौक ही टांगेवाल्यांची 'गंगोत्री' आहे, तर रेल्वे स्टेशन हा त्यांचा 'बंगालचा उपसागर' आहे असें समजावयास पाहिजे. बंगालच्या उपसागरांत जितक्या प्राबल्यानें वादळीवाऱ्यांचा दंगा चाललेला असतो त्यापेक्षां अधिक बेफामपणानें स्टेशनच्या सरहद्दीवर टांगेवाल्यांनीं पुंडाई मांडलेली असते. बिस्केच्या उपसागरांतील लाटांचे तुफानी तडाखे खाल्या-शिवाय ज्याप्रमाणें इंग्लंडच्या किनाऱ्याला पाय लागत नाहींत त्याप्रमाणें बाहेरगांवाहून येणाऱ्या नवख्या मुशाफरांना टांगेवाल्यांच्या कारवाईच्या वादळांत चारदोन गटंगळ्या खाल्ल्यावांचून पुणें शहरांत पाऊल टाकतां येणें अशक्य आहे. बुधवारचौकांत उभ्या असलेल्या टांगेवाल्यांची साधारणतः 'अस्सल पुणेकरांशीं' गांठ पडत असल्यानें त्यांना गाफिलगिरीनें राहून चालत नाहीं. पण स्टेशनच्या बाजूस दबा धरून बसलेला टांगेवाला परगांवच्या बावळट प्रवाशांचा 'चुटकीसरशीं निकाल लावीन' अशा घमेंडींत गुंग असतो. रात्रीची वेळ असली म्हणजे मग टांगेवाल्यांची चांदरातच! त्यांच्या काळ्या कारवाईला काळोख्या रात्रीची चांगलीच पार्श्वभूमि मिळते. नमुन्यादाखल एकच गोष्ट पुरे. अशाच एका काळ्या रात्रीं एक परगांवचा पाहुणा पुण्याच्या स्टेशनवर एकटाच उतरला. बरोबर सामानहि कांहीं फारसें नव्हतें. तथापि होतें तेवढ्या सामानाच्या आधारावर एका चलाख हमालानें सदर पाहुण्याला चार आण्यांची 'टाच' मारून त्याला एका इरसाल टांगेवाल्याचे हवालीं

केलें. रात्रीचे ' आड (odd) टायमाला ' आलेलें गिऱ्हाईक, त्यांत आजूबाजूला जवळपास टांगाही नव्हता. टांगेवाल्यास ' निर्वीर्यमुर्वीतलं ' अशी संधि मिळालेली. तथापि मिळालेल्या सोनसंधीमुळें मनांत वाटणारा हर्ष तोंडावर यत्किंचितही न दाखवितां टांगेवाल्यानें घोगऱ्या सुरांत विचारलें, " कुठें जायचंय् रावसाहेब ? " " हें बघ, मला त्या ससून इस्पितळाच्या शेजारील मेडिकल स्कूलमध्यें जायचं आहे. काय घेशील ? " पुण्याच्या भुगोलाविषयीं फारशी माहिती नसल्यामुळें चांचपडत पाहुणा उत्तरला.

आफ्रिकेमधील तिंबकतूला चलण्याविषयीं त्याला कुणी विचारलें असतें तर तो टांगेवाला इतका दचकला नसता. येरवड्याच्या दिशेला उंच हात फेंकून टांगेवाला ओरडला, " त्ये इस्पितळापसल्या इस्कूलांत ! काय येड आहे काय ? इकत्या वक्तीं पांच रुपये दिले तरी कोणी जाणार नाहीं ! अन् माझं जनावर बी थकलं आहे. टांगा सोडायास मी निघालों नव्हं का ? ' असें म्हणून टांगेवाल्यानें टांगा वळविलादेखील. पाहुण्यांची अगदींच कंबर खचली. संबंध रात्र स्टेशनवर थंडींत कुडकुडत बसावयाचें या विचारानें त्यांच्या काळजांत धडकीच भरली. त्यापेक्षां थोडे ज्यास्त पैसे पडले तरी हरकत नाहीं. रात्रीचा निवारा तरी मिळेल अशा पोक्त विचारानें पाहुणे तीन रुपये द्यावयास तयार झाले. हो ना करतां केवळ आपण परोपकार करतों आहोंत, नाहींतर शक्य नाहीं, असा आव आणून शेवटीं टांगेवाला कबूल झाला. पांच रुपयांचा वांधा आपण तीन रुपयांत तोडला म्हणून आपल्या व्यवहारज्ञानी धूर्ततेवर पाहुणे बेहाय खूष होते. गोल्डस्मिथच्या ' She stoops to conquer ' नाटकांतील चवथ्या अंकांत टोनीनें मिसेस हार्डकासल्ला बागेतल्या बागेंत हिंडवून तिच्या मनावर चाळीस मैल प्रवास केल्याचा जसा आभास उत्पन्न केला तद्वत् सदर टांगेवाल्यानें पुणेरी बोळांच्या चक्रव्यूहांतून पाहुण्यांना बराच वेळ हिंडवून शेवटीं त्यांना मेडिकल स्कूलच्या होस्टेलच्या फाटकांत आणून सोडलें; इतक्या अडचणीच्या प्रवासाचा तीन रुपये मोबदला म्हणजे कांहींच नव्हे अशी पाहुण्यांची खात्री पटून त्यांनीं टांगेवाल्याचे हातावर खुषीनें पैसे टाकले व होस्टेलमधील आपल्या मित्राच्या खोलींत येऊन पसरले. सकाळचे प्रहरीं डोळे किलकिले करून पाहुणे उठावयाच्या बेतांत आहेत तोंच कंठ फुटलेल्या उमेदवाराच्या घोगऱ्या

गळयानें ओरडणाऱ्या एस्. एम्. आर. गाडीचा कर्कश भोंगा अगदीं जवळून कोठून तरी त्यांच्या कानावर आला. त्यावर आश्चर्यचकित होऊन पाहुण्यांनीं आपल्या मित्राला विचारलें, 'काय हो, ही आगगाडी इकडे कोठें आली?' 'म्हणजे? हें काय पलिकडे स्टेशन आहे! इतक्यांत विसरलां वाटतें!' मित्र म्हणाला. 'स्पीसी बँक बुडाल्याची बातमी ऐकून कंबर मोडलेल्या पेन्शनरांच्या चेहऱ्यानें अंगावरील दुलई दूर फेंकून पाहुणे उठून ताठ बसले. पण ते बोलणार काय? फुकटफाकट तीन रुपये घालविल्याबद्दल त्यांना चरफड वाटली; तथापि तीन रुपये देऊनही टांगेवाल्यानें सांगितलेल्या ठिकाणीं आणून सोडण्याची मेहरबानी केली या विचारानें त्यांना समाधान वाटलें. आपल्या बुद्धिवैभवाचा मासला दाखविण्याबद्दल टांगेवाल्यानें त्या मानानें अगदींच कमी फी आकारली याची मात्र त्यांना खात्री पटली.

एका काळीं दिल्लीच्या सोद्याप्रमाणें पुणेरी भामटयाला ऐतिहासिक महत्त्व होतें; तथापि अव्वल इंग्रजशाहींत लांब खिशांचे आंगरखेबहाद्दर जसजसे कमी होऊं लागले तसतसा पुणेरीभामटयांच्या हातचलाखीला कमी वाव मिळूं लागल्यानें त्यांची पीछेहाट होऊं लागली. पेशवाईच्या काळांतील भरणाऱ्या 'जुन्या बाजारां'त खिशांचें केसानें गळे कापीत हिंडणाऱ्या भामटयाला हुडकून काढणें हें त्या वेळच्या नाना फडणवीसांनादेखील शक्य नव्हतें. आजच्या काळांतील जाकिटापाकिटांतील पैसे दिवसाढवळ्या बोलबोल म्हणतां पसार करणारा टांगेवाला हा पुणेरी भामट्यांचा उत्क्रान्त अवतार आहे असें समजावयास मुळींच हरकत नाहीं. दिवाभीताप्रमाणें लपतछपत अंधारांतून फिरणारा भामटा हा प्राथमिक अवस्थेंत आहे असें समजलें तर भर रस्त्यावर गिऱ्हाइकाचा गळा कापणारा टांगेवाला हा त्याच्या उत्क्रान्तीची शेवटची अवस्था आहे असें समजावयाला मुळींच हरकत नाहीं. एका काळीं काळ्या पोषाखांत फिरणारा पुणेरी पोलीस पाहून पुणेकरांच्या छातींत जितकी धडकी भरत नव्हती तितकी टांगेवाल्यांची खाकीवस्त्रविभूषित मूर्ति पहातांच भरते. टांगेवाल्यांच्या खाकी पोषाखानें पोलीसांच्या काळ्या पोषाखावर अशा तऱ्हेनें मात केल्यानें पोलिसांचा (दुर्) लौकिक उतरत चालला. ही गोष्ट सरकारच्या लक्षांत येतांच त्यांनीं सदर 'वर्णभेद' ताबडतोब दूर करून पुणेरी

पोलिसांच्या माथ्यावर टांगेवाल्यांप्रमाणें खाकी रंगाच्या पगड्या चढविल्या आणि वाहनासंबंधीं अत्यंत कडक कायदे करून टांगेवाल्यांची शेंडी पोलिसांच्या हातांत देऊन टाकली. पोलिस आणि टांगेवाले यांच्या पिढ्या तुटून त्यांचें जन्मजांत वैर निर्माण होण्यास तेव्हांपासूनच सुरवात झाली. मांजर दृष्टीस पडतांच कुत्र्याचे जंगली पूर्वज ज्याप्रमाणें त्याच्या थोबाडांत जागे होऊन गुरगुरूं लागतात तद्वत् टांगेवाला दृष्टीस पडतांच आपल्या बेचाळीस पिढ्याचा दुष्मन् समोर आल्याचा भास होऊनच कीं काय पोलिस त्याच्या अंगावर कुत्र्यासारखा चवताळून धांवतो. तथापि मांजर कुत्र्याच्या तडाख्यांत सांपडल्याचें दृश्य आपणास कधींही दिसत नाहीं, त्याप्रमाणें टांगेवाला सहजासहजीं पोलिसच्या कचाट्यांत सांपडल्याचे दाखले फरासखान्यांत फारच थोडे असतील. ' वज्रादपि कठोराणि, मृदूनि कुसुमादपि ' हें वचन महात्म्यांना जितकें लागू आहे तितकेंच तें टांगेवाल्यांना देखील लागू पडतें. पोलिस दृष्टीस पडतांच त्याला सलाम करतांना टांगेवाल्याचा हात फुलापेक्षांहि मऊ होऊं शकतो तर तो जरा दृष्टिआड व श्रुतिच्या टप्प्याबाहेर जातांच त्याच्या साऱ्या कुळगोताचा उद्धार करतांना टांगेवाल्याची जीभ वज्रापेक्षांही कठोर होते. ' चोरी कर पण ती करतांना कधीं सांपडूं नकोस ' हा जसा चोरांच्या शाळेंतील क्रमिक पुस्तकांतील पहिला धडा आहे, तद्वत् ' कोठलाही सरकारी नियम पाळूं नकोस—पण त्याजबरोबर पोलिसाच्या हातांत कधींही सांपडूं नकोस ' असें टांगेवाल्याच्या नीतिशास्त्रांतील पहिलें कलम आहे.

एका टांग्यांत दोहोंपेक्षां अधिक इसम बसूं नयेत हा झाला सरकारी नियम; पण आपल्या टांग्यांत दोहोपेक्षां अधिक इसम बसलेले कोणालाही दिसूं नयेत हा झाला टांगेवाल्यांचा नियम. या नियमाच्या विलक्षण अंमलबजावणींत प्रत्यक्षपणें सांपडण्याची संधि गुंग्या नामक माझ्या एका जुन्या दोस्ताला एकदां मिळाली होती. गुंग्याची उमर त्या वेळीं १० वर्षांची असेल. तो, त्याचे वडील आणि मातोश्री अशीं तिघें मुंबईहून दुपारच्या एक्सप्रेसनें निघून संध्याकाळचे सुमारास पुण्याचे स्टेशनावर येऊन पोहोंचलीं. स्टेशनबाहेर आल्यावर तिघांना एका टांग्यांतून घरीं कसें जातां येईल या विवंचनेंत गुंग्यांचे वडील उभे होते इतक्यांत समोरच्या एका टांगेवाल्यानें अंतर्ज्ञानानें त्यांची ही अडचण जाणली. रजिस्ट्रेशनखात्यांतील कारकुनाच्या सावधगिरीनें तो

त्याच्याजवळ आला व 'हें काम काय—कांहींच नाहीं !' अशा तुच्छतेच्या स्वरांत त्यानें त्यांच्या कानांत कुजबूज करून त्याचें समाधान केलें. झालें. वडील व मातोश्री टांग्याच्या मागील बाजूला बसली. टांगेवाल्याच्या डाव्या हाताची मानाची जागा आपणांस मिळणार असें गुंग्याच्या बालबुद्धिला वाटून त्याला खूपच आनंद झाला तथापि, टांगेवाल्याचें डोकें हें त्याच्या टांग्या-प्रमाणें कसें आणि कुठें चालेल हें इतरांना कळणें अशक्य आहे. सपाट डांबरी रस्त्यावर पुणेरी टांगेवाल्याचें घोडें नेहमींच घसरावयाचें. खाचांखळ-ग्यांच्या बोळांतून जातांना मात्र त्याला विलक्षण जोर येतो. टांगेवाल्यानें पुढील बाजूनें गुंग्याला ओढून वर घेतलें व आजूबाजूला कोणी पहात नाहीं असें बघून त्याला पायस्थाच्या खोक्यांत ढकलून ट्रंकेंत पुस्तकें भरल्याप्रमाणें दाबून आडवें निजवलें. आणि तळाशीं पसरलेल्या विलायती गवताचे चार टहाळे त्याच्या अंगावर पसरून दिले. मातोश्रीची गुंग्याकडे पाठ होती म्हणून बरें, नाहीं तर आपल्या एकुलत्या एक पोराची वळकटीच्या मोलानें वासलात लागतांना पाहून त्यांनीं हंबरडा फोडला असता. वडिलांनीं सर्व प्रकार खांद्यावरून काणाडोळा करून बघितला, पण चार आणे वांचत आहेत या आनंदानें त्यांनीं तिकडे काणाडोळा केला. गुंग्याच्या डोक्याची दया येऊन की काय टांगेवाल्यानें आपल्या भाकरीचें गाठोडें त्याच्या उशागति ढकलून दिलें. पण त्या गाठोड्यानें त्याच्या डोक्याला विसावा मिळावयाच्या ऐवजीं त्यांतील लसणाच्या चटणीनें व कसल्याशा वस्तूच्या 'कोरड्यासा' नें त्याचें डोकें उठून जावयाची वेळ आली. टांगा चालतांना एखाद्या दुधवाल्याच्या छकड्यामध्यें ठेवलेल्या कासंडींतील दुधाप्रमाणें गुंग्याच्या हाडांना हेलकावे बसत होते. 'सुपली 'च्या आडोशाला जरा उठून बसावयाचा त्याचा विचार होता पण टांगेवाल्यानें आपले पाय त्याच्या छातीवर ठेवून दिले होते. व घंटा दाबण्याचा त्याच्या पायाच्या आंगठ्याला सराव होता म्हणूनच कीं काय तो मधून मधून गुंग्याच्या छातीवर आपला आंगठा जोरानें रोंवीत होता. त्यामुळें घंटा जरी नाहीं तरी शंख वाजण्याचा बराच संभव होता. पण हा सर्व अकल्पित प्रकार पाहून गुंग्याची दांतखिळी बसली असल्यामुळें त्याला शंख-वादन करण्याची संधीच मिळाली नाहीं. घरापुढें टांगा उभा राहतांच गुंग्याला खालीं उतरवतांना मात्र दोन माणसांची जरूरी लागली. या गोष्टीचा

गुंग्याच्या मनावर इतका परिणाम झालेला आहे कीं 'टांगा' हा शब्द उच्चारतांच अजूनपर्यंत गुंग्याची दांतखिळी बसते. पुणेरी टांगेवाल्याशीं जानपछान नसणाऱ्या लोकांना सदर गोष्ट दंतकथा आहे असें वाटण्याचा संभव आहे. पण आम्हीं त्यांना खात्रीपूर्वक सांगतों कीं एखादा जादा उलट्या काळजाचा टांगेवाला वेळप्रसंग पडेल तर वर्षा आंतलें कोवळें पोर टांग्याच्या बैठकीखालील चोरकप्प्यांत घालून न्यावयास मुळींच कमी करणार नाहीं.

दोहोंपेक्षां अधिक इसम नेण्याची टांगेवाल्याजवळ एवढीच युक्ति नाहीं. पावसाळ्याचे दिवस असले म्हणजे पोलिसांच्या डोळ्यांत राजरोस चिखल उडविण्याचा त्यांना 'लेसन' (License) च मिळतो. भोंवतालीं मेण-कापडाच्या काळ्या कनाती सोडून दिल्या म्हणजे आंतल्या काळ्या अंधार-कोठडींत तीन 'स्वाऱ्या' भरपेट बसावयास मुळींच हरकत नाहीं. पण पावसाची सबब नसतांनाही तिसरा इसम नेण्याची एक अजब शक्कल एका टांगेवाल्यानें लढविलेली आमच्या माहितींत आहे. सदाशिवपेठेंतील ब्राह्मण-वस्तींत संध्याकाळचे सुमारास एक टांगा एका घरापुढें उभा राहिला. भोंवताली पांढरी चादर गुंडाळली असल्याकारणानें आंत कोणीतरी मुसलमान स्त्रिया असाव्यात अशी इतरांची साहजिकच समजूत झाली. पण संध्याकाळचे वेळीं, ब्राह्मणवस्तींत मुसलमानी बाया येण्याचें काय कारण असावें अशी जिज्ञासा पहाणारांच्या अंतःकरणांत जागृत झाली. तथापि थोड्याच वेळांत पांढऱ्या चादरींआंतून तीन लठ्ठ वयातीत असामी जेव्हां गंभीर चेहरे करून बाहेर पडतांना दृष्टीस पडले तेव्हां त्या 'गोषांतील सुंदरस्त्रियांच्या' रहस्याचा उलगडा झाला. सदर टांगेवाला मुसलमान होता असें आम्हांला चौकशीअंतीं कळल्यावर त्याच्या युक्तीच्या औचित्याची आम्हांस संगति लागली. गोषापद्ध-तीस अनुकूल असणाऱ्या मुस्लीमभाईनीं गोषामुळें होणारा सदरील फायदा आपल्या दप्तरीं दाखल करून ठेवावा अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे.

पोलीसांच्याविरुद्ध अशा तऱ्हेनें चालविलेल्या मोहिमेंत टांगेवाल्यांना मदत करण्यांत गिऱ्हाइकाचा प्रत्यक्ष फायदाच असतो. त्यामुळें टांगेवाल्यांच्या अंगावर बाजू क्वचित्‌च उलटते. पण या गिऱ्हाइकांच्या सहाय्याबद्दल त्यांच्या विषयीं उपकारबुद्धि बाळगणें हें आपलें कर्तव्य आहे अशी कल्पना टांगेवा-ल्याच्या डोक्यांत चुकून देखील येत नाहीं. 'दहा तऱ्हेचीं दहा गिऱ्हाईकें—

त्यांच्याशीं जशास तसें या न्यायानें वागावयास पाहिजे.' हा कौटिल्यनीतींतला सिद्धांत टांगेवाला आपल्या उराशीं कवटाळून असतो. घरीं आलेल्या अतिथीस एखादा सद्‌गृहस्थ 'हें घर आपलेंच आहे' असें समजण्याची नम्रपणें विनंती करीत असतो. तर होतकरू गिऱ्हाइकास प्रथमदर्शनींच 'साहेब' 'हा आपलाच टांगा आहे' असें समजण्याबद्दल टांगेवाला खड्या सुरानें बजावीत असतो. मृत्युपत्र लिहितेवेळीं अचानकपणें उलटणाऱ्या नातेवाइकाकडे आसन्नमरण श्रीमंत ज्या दृष्टीनें पहात असतो, त्याच आश्चर्ययुक्त दृष्टीनें आपल्याशीं नातें जोडणाऱ्या टांगेवाल्याकडे गिऱ्हाइक जों बघतें तोंच त्याच्या हातांतील सामानावर आपलेपणाचा हक्क बजावून त्याची रवानगी टांगेवाल्यानें आपल्या टांग्यांत आधींच केलेली असते. गांठोड्यांच्या मागोमाग गिऱ्हाईकही मंतरलेल्या मांजराप्रमाणें टांग्यांत जाऊन बसतें. हत्तीचे खाण्याचे दांत दाखविण्याच्या दांतांपेक्षां निराळे असतात तद्वतच गिऱ्हाईक टांग्यांत बसतेवेळीं व खालीं उतरतेवेळीं टांगेवाला सोयीप्रमाणें निरनिराळीं स्वरूपें धारण करतो. गिऱ्हाईकानें कितीही भाडें दिलें तरी आपल्या कामाचें मोल बरोबर झालें नाहीं अशा अर्थाचा सात्विक संताप तो आपल्या मुद्रेवर दाखवून भाड्याचे पैसे गिऱ्हाइकांच्या अंगावर फेंकून दिल्यावांचून रहात नाहीं. नुसत्या आरडा ओरडीनें व हातवाऱ्यानें काम साधलें नाहीं तर आपलेपणाच्या हक्कानें टांग्यांत आधीं उचलून आणलेलीं गांठोडीं गिऱ्हाइकाच्या डोक्यावर आदळून सदर टांगा 'आपल्या वडिलांचा नसल्याबद्दलची' नवी बातमी तो त्याला बजावून सांगूं लागतो.

'संकटें एकटीं येत नाहीं—तीं झुंडीनें येतात' या म्हणीप्रमाणें टांगेवाले गिऱ्हाइकाच्या अंगावर पुष्कळ वेळां झुंडीनें तुटून पडतात. एक एक टांगेवाला गिऱ्हाईकाचें मार्थे फिरवून टाकण्यास समर्थ असतां किमु यत्र चतुष्टयं ! एखादें धांदरट गिऱ्हाईक अड्ड्यावर येतांच 'आपला टांगा—' 'आपला टांगा' गर्जना करीत चार टांगेवाले त्याच्या अंगावर टांगे पिटाळीत नेतात. चक्रव्यूहांत सांपडलेल्या अभिमन्यूप्रमाणें गिऱ्हाईक बावरून इकडेतिकडे पहातें आहे तोंच त्याला एखाद्या दुसऱ्या टांग्याचा धक्का लागून त्याच्या पायावरून चाक देखील निघून गेलेलें असतें मग मात्र फलविरहित आम्रवृक्षाचा त्याग करून विहंग ज्याप्रमाणें दूर दूर गमन

करितात, त्याप्रमाणें चारी टांगेवाले चारी दिशाला पसार होतात. आणि पाय मोडून रस्त्यावर दडलेल्या त्या दुर्दैवी प्राण्याला 'रेड क्रॉस' मोटारींतून इस्पितळाचा रस्ता सुधारावा लागतो. एखाद्या गिऱ्हाइकाजवळ पुष्कळसे बोजे असले म्हणजे टांगेवाल्यांना आपली करामत दाखविण्यास पुष्कळच वाव मिळतो. टोपीवाल्या व्यापाऱ्याच्या गांठोड्यांतील मालाची पांगापांग करणाऱ्या माकडांप्रमाणें गिऱ्हाइकांच्या गठड्यांची चार टांगेवाले चार ठिकाणीं विभागणी करून बहामनी राज्याप्रमाणें त्याची दुर्दशा करून सोडतात.

तोंडावरून कुंडली मांडणाऱ्या ज्योतिष्यांप्रमाणें परगांवचें गिऱ्हाईक नुसतें त्याच्या चर्येवरून ओळखण्यांत टांगेवाल्यांचा हातखंडा असतो नुसता घराचा नंबर सांगून गप्प बसणारें गिऱ्हाईक हमखास परगांवचें असलें पाहिजे असा टांगेवाल्यांचा आडाखा आहे. यापेक्षां अधिक खुलासेवार पत्ता गिऱ्हाइकानें दिला असला तरी टांगेवाल्यांच्या मनांत आल्यास तो त्याची टांग्यांतून वाटेल तशी धिंड काढून, उलट त्याबद्दल त्याच्याच खिशाला 'चाट' लावयाला चुकत नाहीं. पत्र्या मारुतीपाशीं जाऊं इच्छिणाऱ्या गिऱ्हाइकाला गवत्या मारुतीच्या पायापाशीं नेऊन तो सोडतो, तर मोदीच्या गणपतीशेजारील गिऱ्हाइकाला तो गुंडाच्या गणपतीच्या हवालीं केल्याशिवाय रहात नाहीं. लग्नाच्या मोसमांत तांबड्या जोगेश्वरीला जाणाऱ्या वऱ्हाडी बायकांचें लेंढार तो पिवळ्या जोगेश्वरीच्या देवळांत नेऊन नेमकें सोडतो; आणि नूतन आर्यभूषणांत राजापूरकरांचें तुकाराम नाटक पहाण्यास निघालेल्या व्याहीमंडळींच्या सेनेला तो जुन्या आर्यभूषण थिएटरांतील 'चौरंगी सामना' दाखविण्याचें श्रेय घेतो.

साहेबी थाटाच्या गिऱ्हाइकांना आणि परगांवच्या प्रवाशांना 'बनविणें' हा टांगेवाल्यांच्या हातचा मळ आहे, तथापि या दोन वर्गांशिवाय टांगेवाल्यांना आश्रय देणारा किंवा त्यांच्या मानगुटीवर बसणारा तिसरा एक महत्त्वाचा वर्ग पुण्यामधें आहे. या वर्गांत 'सेन्ट्रल बिल्डिंग्ज्' नामक कारकुनी कुतुबमिनारांत काम करणाऱ्या सरकारी नोकरांचा समावेश होतो. पाल पहातांच जसा विंचू नांगी टाकतो तद्वत् हातांत फराळाचा डबा घेऊन बुधवार चौकांतून जाणारा सरकारी नोकर पहातांच टांगेवाल्याची असहाय स्थिति होते. दयाळू मायबाप सरकारचा सदर सेवक हपिसाच्या वेळेच्या तब्बल एक घंटा आधी निघालेला असल्यानें अगदीं सावकाश पायांनीं गेलें तरी त्याला उशीर

होण्याची भीति नसते. यामुळें त्याच्या हालचाली अगदीं संथपणानें चाललेल्या असतात. गाडी पकडण्याच्या आतुरतेनें घायकुतीस आलेल्या गिऱ्हाइकाची घाबरट चर्या आणि दीडदोन आण्यांच्या खर्चांत 'सेन्ट्रल बिल्डिंग्ज्' मधें जाण्याची आकांक्षा धरणाऱ्या कारकुनांची बिलंदर मुद्रा यांतील फरक न जाणण्याइतका कांहीं टांगेवाला मूर्ख नसतो. असलीं इरसाल कुळें तो चांगलींच ओळखून असतो. "साहेब, कुठें जायचंय?" असें टांगेवाला दबकत दबकतच विचारतो त्यावर "सेंट्रल बिल्डिंग—एक स्वारी—दोन आणे." अशी भवानीमाता अंगांत संचारलेल्या शिवाजीमहाराजांप्रमाणें सूत्रमय वाक्यें बोलून कारकून तडक पुढें चालूं लागतो. "साहेब, चार आणे," टांगेवाला जरा ओढून धरावयाचा प्रयत्न करतो. पण कारकून मागें वळून पहाण्याइतकी-देखील त्या शब्दांना किंमत देत नाहीं. मात्र टांगेवाल्यानें 'या' म्हणून हांक मारली तर ती ऐकूं येईल इतक्या सावधगिरीनें तो चाललेला असतो. "बरें—या साहेब, काय दोन आण्यासाठीं आमचें पोट मारतां?" शेवटीं टांगेवाला हार खातो. तथापि आपल्या विजयानंदाची छटा तोंडावर न दाखवितां कारकूनमजकूर गंभीर चेहऱ्यानें टांग्यांत चढून बसतात. टांगेवाला 'दुसऱ्या स्वारी'ची वाट पहात पांच मिनिटें टांगा घोळवतो. थोडासा उशीर झाला म्हणजे 'पहिली स्वारी' चुळबुळ करूं लागेल व एखादी दुसरी आणेली जादा देण्याला तयार होईल अशी त्याची अपेक्षा असते. पण कारकुनासंबंधीं केलेल्या अपेक्षा नेहमीं खोट्या ठरतात हें त्याला बिचाऱ्याला काय ठाऊक? 'पहिली स्वारी' अगदीं इतिहाससंशोधकाच्या दृष्टीनें समोरील दुकानावरील पाटीचीं अक्षरें न्याहाळीत बसलेली असते. जर करतां 'दुसरी स्वारी' पहिल्या स्वारीच्याच दहा दिवसांतील नातेवाईक मिळाली तर दोघांच्या बेचाळीस पिढ्यांचा मनांतल्या मनांत जप करीत टांगेवाला आपला टांगा हाकलतो. एखादा नवखा टांगेवाला असला म्हणजे कारकुनी कसबाची त्याला इतकी ओळख नसते; कारकूनाच्या 'दोन आण्याच्या' वायद्याला, "दोन आणे रावसाहेब, मोटारीच्या स्वारीला पडतात—टांग्याच्या स्वारीला नव्हे!" असा खरपूस टोमणा तो कारकुनाबरोबर पलीकडे उभ्या असलेल्या भाड्याच्या 'मोटार लॉरी'ला ही देण्यास चुकत नाहीं. टांगेवाल्याच्या तोंडाला लागण्याइतका कारकून थोडाच उथळ मनाचा असतो! तो आपल्या शिरस्त्याप्रमाणें

पुढें चालूं लागतो. इकडे थोडा वेळ वाट पाहून दुसरें गिऱ्हाईक मिळण्याची कांहीं आशा नाहीं असें वाटतांच 'आठ आण्यांच्या येणाऱ्या स्वारीपेक्षां दोन आण्याची आलेली स्वारी अधिक खरी' अशा पोक्त विचारानें टांगेवाला आपला टांगा, सोडमुंजीच्या वेळीं रागावून काशीला जाणाऱ्या मुंजाच्या उसन्या रागानें पुढें जाणाऱ्या गिऱ्हाइकाच्या मागून हळूहळू नेतो. 'या साहेब, तीन आणे द्या, झालें!' टांगेवाला आर्जवानें सांगतो. 'दोन आणे!' कारकुनाच्या अंगांत या वेळीं हॅम्लेटच्या बापाचा संचार झालेला असतो. गांव देतों, प्रान्त देतों, राज्य देतों अशी याचना करीत देवघरीं चाललेल्या ध्रुवाच्या मागोमाग जाणाऱ्या असहाय राजाप्रमाणें चार-आणे तीन आणे-दोन आणे करीत टांगेवाला बुधवार चौकापासून पासोड्यामारुतीपर्यंत कारकूनाच्या मागोमाग चाललेला असतो. शेवटीं टांग्यांत बसलेला टांगेवाला कंटाळतो पण पायीं जाणारा कारकून दमत नाहीं. 'बरें या रावसाहेब तुम्ही म्हणतां तसें का होईना!' असा अखेर टांगेवाला समेटाचा सवाल जों टाकतो तों 'नाहीं, आतां दीड आणा!' असें चोख हिशेबी उत्तर कारकून त्याच्या तोंडावर फेंकतो. 'आइस्क्रीमचें पॉट' डोक्यावर उपडें झाल्याप्रमाणें टांगेवाला अगदीं सर्दच होतो. 'या—काय वाटेल तें द्या-किंवा देऊंही नका!' असे कसे तरी त्याच्या तोंडून शब्द निघतांच 'वा! वाटेल तें काय द्या, चौकापासून दोन आणे इथून दीड आणाच—उगाच काय—" इत्यादि शब्द पुटपुटत कारकून एकदांचा टांग्यांत जाऊन बसतो. 'फरासखान्याचें नांव काढतांच ज्याच्या मनावर यत्किंचितही परिणाम होत नाहीं तोच टांगेवाला 'सेंट्रल बिल्डिंगचें नांव काढतांच 'रामनाम' कानीं पडलेल्या भुताप्रमाणें थरथर कांपूं लागतो. एकटा कारकूनपेशाचा वर्ग वजा केला तर पुणेरी टांगेवाला 'कोणाच्या बापा'लाही भिणार नाहीं. आणि हेंहि पण रास्तच आहे, कां कीं कारकुनी कारवाईपुढें सरकारलादेखील हात टेंकावे लागतात, तर टांगेवाला किस झाडकी पत्ती!

'चांगली गोष्ट करण्याचे जसे १०१ मार्ग असतात' तसे वाईट गोष्ट करण्याचे अनेक कु मार्ग आहेत. गिऱ्हाइकांना छळण्याची टांगेवाल्याच्या पोतडींत अनेक 'इलमें' आहेत. कांहीं कारण नसतांना गिऱ्हाइकांची खोडी करण्यांत एखाद्या वात्रट विद्यार्थ्याप्रमाणें टांगेवाल्याला ब्रह्मानंद होत असतो.

दोघे मित्र टांग्यांत बसून जात असावेत आणि त्यांच्या गप्पांना चांगला रंग येत चढलेला असावा तोंच " साहेब, टांगा जरा उलाळ आहे–पुढच्या बाजूला बसा ! " असें म्हणून त्या मित्रांची जोडी फोडून वेगळी केल्याशिवाय तो कधींही रहाणार नाहीं. टांगेवाल्याच्या शेजारीं बसणें कमीपणाचें आहे असें वाटत असलेल्या गिऱ्हाइकांवर तर टांगेवाला हा प्रयोग हटकून केल्यावांचून रहात नाहीं.

एकाद्या महत्त्वाच्या कामासाठीं घराबाहेर घाईघाईनें निघावें व जवळपास टांगा मिळेल तर बरें अशा विचारानें आपण आजूबाजूस पहावें तों एखाद्या धुरकट ' विश्रांतिगृहा 'च्या समोर आपला टांगा उभा करून " योक सिंगल–आखा पाव व पापड " यांचा समाचार घेत टांगेवाला आपल्या दृष्टीस पडतो–किंवा आपण त्याच्या दृष्टीस पडतों. आपणास पहातांच, " साहेब, टांगा खालीं आहे " अशी त्यानें ' पाव ' भरल्या तोंडानें किंकाळी ठोकलीच म्हणून समजावें. बरा जवळचेजवळ टांगा मिळाला, अशा समाधानानें आपण टांग्यांत चढून बसावें, तों टांगेवाल्याचा खाना अद्यापि चालूंच असतो. ' झालेंच साहेब ' असें मधूनमधून तो आपणास आश्वासन देतो. शेवटीं कसेंबसें खाणें उरकून तो हॉटेलच्या पोऱ्याला पुकारतो व " मोड आहे का ?" असें विचारतो " अरे जा, मोड आण लवकर–साहेब कवाचे खोळंबलेत ! " असें तो पोऱ्यावर संतापून ओरडतो. पोऱ्यानें आणून देतांच " अरे, सीझर नाहीं आणलीस ? " असें पुन्हां पुन्हां तो ओरडून विचारतो. शेवटीं ' सीझर ' हातीं पडतांच ती शान्तपणें शिलगावून धुराचे फवारे नाकांतून काढीत टांगेवाला टांगा हाकलतो. तोंपर्यंत हातांतल्या घड्याळाकडे ( जर असेल तर, नाहीं तर आपलीं आहेतच ) पहात बसण्यापलीकडे आपणांस कांहींच करतां येत नाहीं. टांगा जरा पुढें कोठें जातो आहे तों घोडें अडून मस्ती करावयास लागतें. " कांहीं नाहीं साहेब, इथें तबेला आहे–म्हणून अडतें आहे हें ! " असें टांगेवाला आपल्या प्रश्नार्थक खुणेला उत्तर देतो. शेवटीं तो स्वतः खालीं उतरून घोड्याचा लगाम खेंचतो व चार पावलें त्याला पुढें ओढल्यावर टांगा चालू होतो. कांहीं वेळानें चाबकाची वादी तुटून खालीं पडते. टांगेवाला खालीं उडी मारून आपल्या खाकी चोळण्यांतून बाहेर आलेलें धोतर सांवरीत सांवरीत पळत जातो. तेवढ्या वेळपर्यंत मागून येणाऱ्या टांगेवाल्यानें ती वादी

पळविली नाहीं तर नशीबच समजावयाचें. पुन्हां टांगा चालू लागतो. इतक्यांत घोड्याला रस्त्यामध्यें पाण्याची कुंडी दिसते. घोडेंच तें–पाणी पिणारच. इकडे आपल्या अंगाचा अगदीं संताप होऊन गेलेला असतो. घोड्यापेक्षां आपणांलाच पाण्याची अधिक जरूरी असते. जलपान उरकल्यानंतर घोडें थोडेंच थांबणार ! मग मात्र टांगेवाल्याच्या हातामध्यें इरेसरीचें वारें येतें. शेलक्या शिव्यांचा आणि चाबकाच्या फटकाऱ्यांचा घोड्यावर वर्षाव करून आपण आपल्याकडून कांहीं कसर करीत नसल्याचा तो आव आणतो. गुन्हेगार बेरड आणि टांग्याचीं घोडीं हीं माराला थोडींच दबणार ?—तो तर त्यांच्या पांचवीलाच पुजलेला असतो. चोराची नीति व घोड्याची गति मारानें कधींही सुधारावयाची नाहीं. इतकें कुठें होत आहे तो टांग्याची रबरी धांव निसटून टांग्याचा रस्त्यांतच तैमुरलंग जालबंद होतो. भोंवताली रिकामटेकड्या तमासगिरांचा तांडा जमतो व त्यांतील कांहीं म्होरके ‘काय झालें?’ म्हणून आपणापाशीं पृच्छा करूं लागतात. रस्त्यावरचा एखादा दगड उचलून त्यानें टांगेवाला कशीबशी एकदांची धांव ठोकून बसवतो व पुन्हां टांगा चालू होतो. मध्येंच एखाद्या दुकानापाशीं “साहेब—एक मिनिट अं ! जरा मेणबत्त्या घेतों !” असें म्हणून थांबल्यावांचून तो रहात नाहीं. पुढें कुठें तरी “पल्याड घर आहे–जरा भाकरी घेऊन येतों.” अशी सबब सांगून तो टांगा उभा करतो. इतकी सर्व दिरंगाई सोसून संसारावर तुळशीपत्र सोडल्याच्या निर्विकार अविर्भावानें आपणांस पाठीमागें स्वस्थ बसल्यावांचून गत्यंतर नसतें. अर्धा मधीं टांगा बदलणेंही शक्य नसतें. याशिवाय रस्त्यावरील रहदारीच्या गोंधळामुळें आणि ‘काम चालू, रस्ता बंद’ असल्या धोक्याच्या पाट्या दिसतांच घ्याव्या लागणाऱ्या आडवळणामुळें वारंवार होणारीं कुचंबणा निराळीच. अशा तऱ्हेनें जर करतां मध्यें टांग्याचे पोल व इतर कोठलेंही भाग (Part) मोडले नाहींत असें आपण गृहीत धरलें तर दर कूच दर मजल करीत आपण इष्ट स्थळीं निदान आपण एक तास तरी उशीरां जाऊन पोहोंचतो. म्हणजे तुकारामी सहनशीलता अंगांत असेल तर त्याच टांग्यानें उलटपावलीं घरीं परतण्यापेक्षां दुसरा मार्ग नसतो.

एखादी गाडी गांठावयाची असेल—मग ती सदर्न मराठ्याची का असेना—तर टांगेवाला आपणांस सपशेल तोंडघशीं पाडल्यावांचून कधींही रहाणार

नाहीं. Passenger proposes but Tangawalla invariably disposes. तिकडे गाडी कोकावयाला व आपला टांगा स्टेशनच्या आवारांत यायला एक गांठ पडते. त्यांत दुर्दैवानें आपणांजवळ सुटे पैसे नसतात. म्हणून आपण टांगेवाल्याला एक रुपया देऊन जों मोड मागतो तों 'मजजवळ कुठली मोड, आतांच टांगा जोडला. आपलीच पहिली भवानी !' असें सांगून तो मख्खासारखा उभा राहतो. गाडी चुकणार या भीतीनें आपल्या काळजाचा अगदींच कबाब झालेला असतो. इतक्यांत स्फूर्ति आल्यासारखें करून 'थांबा, मी आणतों मोड' असें म्हणून तो पसार होतो व नादारींत निघालेल्या गुजराती शेठियाप्रमाणें कायमचा बेपत्ता होतो. अशावेळीं गाडी गांठणें जर शक्य असेल तर चार-आठ आण्यांवर पाणी सोडून आपणांस प्लॅटफार्मकडे धांव घ्यावी लागते. राजेरजवाड्यांप्रमाणें टांगेवाल्याजवळ मोड कधींही मिळावयाची नाहीं. आमच्या शेजारचे बजूकाका खिशांत पैपर्यंत मोड आहे अशी खात्री करून घेतल्याशिवाय टांग्यांत कधींच पाऊल टाकीत नाहींत.

ज्या वेळीं घाई असेल त्यावेळीं टांग्याच्या चाकाला कांसवाच्या पाठीची टायर बसविलेली असते तर ज्यावेळीं गिऱ्हाइकास सावकाशी असेल त्यावेळीं टांगेवाल्याला हजार हरणांचा जोर चढतो. टांगेवाला हा महत्त्वाकांक्षी आहे. तो आहे त्या स्थितींत कधींही समाधान मानीत नाहीं. मागून येणारा प्रत्येक टांगा पुढें जाण्याच्या खटपटींत असतो. यामुळें वेळीं अवेळीं रस्त्यावरून दोन टांग्यांची शर्यत जुंपल्याचें दृश्य आपणांस पहावयास मिळतें. असल्या शर्यतींत म्हाताऱ्याकोताऱ्या गिऱ्हाइकांना जादा वारा लागून न्यूमोनिया होण्याचा संभव असतो तर तरण्याताठ्या गिऱ्हाइकांचा हातपाय मोडल्याशिवाय रहात नाहीं. तशांत टांगेवाल्यांनीं 'वाईच निशापानीं' केलेलें असलें म्हणजे तर त्याच्या अंगांत महिषासुरमर्दिनीचा संचार झालेला असतो. अशावेळीं रणदेवता अंगांत संचारलेल्या वीराप्रमाणें त्यांना दुसऱ्यांच्या प्राणांची यत्किंचित्‌ही गुमान वाटत नाहीं. टांग्याच्या मागें बसणाऱ्या गिऱ्हाइकाच्या अंगांत चार आणे वाराच्या चिटाचा सदरा असला तरी तें रस्त्यावरील पादचारीं गिऱ्हाइकाकडे जितक्या तुच्छतेनें पहात असतें, तितक्याच तुच्छतेनें टांगेवाला आपल्या पुढें येणाऱ्या पदातीकडे पहात असतो. टांगा हांकण्याचा कैफ एकदां टांगेवाल्याच्या डोळयावर चढला कीं मागचें पुढचें पहाण्याची—म्हणजे मागचें

गिऱ्हाईक आणि पुढचे लोक—यांजकडे लक्ष देण्याची त्याला मुळींच शुद्ध रहात नाहीं. आमच्या आळींतील त्रिंबकराव टांगेवाल्याच्या हातून दिवसाढवळ्या रस्त्यावर फांशीं जात असतांना मोठ्या शिकस्तीनें वाचले. त्रिंबकरावांना गळ्याभोंवतीं उपरणें गुंडाळुन त्याचे सोगे खालीं सोडून चालण्याची फार जुनी संवय आहे. एकदां घाईघाईंत टांग्यांत बसतांना त्यांच्या उपरण्याचें एक टोंक टांग्याच्या चाकांत अडकलें. टांगा चौखूर निघाला. त्याबरोबर फिरत्या चाकांत उपरणें गुंडाळलें जाऊन त्रिंबकरावांच्या मानेला चांगलाच फास बसला. टांगेवाल्यास ओरडून सांगावें तों उपरण्याचा वेढा गळ्याला इतका घट्ट बसला होता कीं त्रिंबकरावांना श्वासोच्छ्वास करण्याची देखील पंचाईत पडली, तर शब्द कोठून निघणार ! मागें बसलेलें गिऱ्हाइक मेलें आहे कां जिवंत आहे हें प्राण गेला तरीं टांगेवाला पहाणार नाहीं. शेवटीं रस्त्यावरून जाणाऱ्या एका इसमानें हा प्रकार पाहतांच तो टांग्यापुढें धांवला व टांगेवाल्याला कळतील असल्या भाषेंत चार शिव्या हसडून त्यानें टांगा थांबवला. त्रिंबकरावांच्या तोंडाला इकडे चांगलाच फेंस आला होता. त्यांना शुद्धीवर यावयास अर्धा तास लागला. तथापि तो प्रकार पाहून टांगेवाला शुद्धीवर आल्याचें मुळींच चिन्ह दिसेना. "वाईच घुऱ्याबिऱ्याचा झटका आलाय ! दुसरें काय ?" असें भोंवतालीं जमलेल्या तमासगिरांना सांगून त्रिंबकरावांच्या दुर्दशेशीं आपला कांहींच संबंध नसल्याचें तो दाखवूं लागला. दिवसा रहदारीच्या रस्त्यावर लोकांच्या प्राणाशीं दंगामस्ती खेळणारा हा बहाद्दर संध्याकाळीं साडेसाताच्या आंत एकाद्या गुत्त्याच्या आजूबाजूला चारचौघा टांगेवाल्यांशीं मारामारी करीत असलेला दृष्टीस पडतो. देशभक्त हा जसा बहुतेक वकील असतो तद्वत् टांगेवाला हा बहुतेक दारूबाज असतो. टांगा हा नाद आहे. हें व्यसन आहे. म्हणूनच टांगेवाले ज्या ठिकाणीं एकत्र जमतात त्यास 'अड्डा' अशी संज्ञा आहे. एकदां टांगा हाकण्याच्या नादाला लागलेला मनुष्य जन्मभर टांगेवालाच राहतो. व्यसन हें एकेरी कधींही असूं शकत नाहीं. चहाप्राशन केल्याची लज्जत खुमासदार विडीनें जशी खुलते तशी टांगा हांकून होणारी दमछाट बेवड्याच्या एका ढोसानें खुली होते.

एका घरांतील दोन माणसांचें क्वचित्‌च जुळतें. टांगेवाला या नियमाला कसा अपवाद असूं शकणार ! एका टांगेवाल्याचा दुसऱ्या टांगेवाल्याशीं टक्कर

होतांना व मारामारी करतांनाच फक्त प्रत्यक्षपणें संबंध येऊं शकतो. विरुद्ध दिशेनें येणाऱ्या टांगेवाल्यांना तो 'दाबून घेण्या' विषयीं आणि 'सायटीनें चालण्या' विषयीं सारखा दटावीत असतो. रस्त्यावरून जाणाऱ्या छकड्यांना तो 'To call spade a spade' या न्यायानें 'छकडा' म्हणून खिजवतोच पण आपल्यापेक्षां चांगल्या स्थितींत असलेल्या टांग्यांना तो 'खटारा' या पदवीचा आहेर करावयास मागेंपुढें पहात नाहीं. स्वतःचे घोडें पंचकल्याणी असल्याबद्दलची त्याला खात्री असते, तितकीच दुसऱ्या टांग्याचें घोडें 'गावरान' असल्याबद्दलची तो खात्रीलायक माहिती सांगत असतो. स्वतःचा टांगा 'फर्स्टक्लास' असल्याची ग्वाही देऊन तो गिऱ्हाइकांना आपल्या टांग्यांत ओढण्याचा प्रयत्न करीत असतो. दुसऱ्याच्या टांग्यांतून 'आजच प्लेगची केस' गेली असल्याची बातमी सांगून गिऱ्हाइकांना चार हात पळविण्याचा 'स्तुत्य उद्योग' करीत असतो. दुसऱ्याच्या वकीलाचे अशील फोडून आणणें हें जसें प्रत्येक वकीलाचें कायदेशीर कर्तव्य असतें तसें दुसऱ्या टांग्यांत चढणाऱ्या 'स्वारीचा' पाय मागें खेंचून त्याला आपल्या गोटांत आणणें हें प्रत्येक जातिवंत टांगेवाल्याचें ब्रीद आहे.

कांहीं दिवस सासूचे तर कांहीं दिवस सूनेचे या न्यायानें सर्वच काळ टांगेवाल्यांची पुंडाई चालते असें नाहीं. गिऱ्हाइकांचेंही कांहीं पूर्वजन्मीचें पुण्य आहेच कीं नाहीं. टांगेवाल्यांना गिऱ्हाइकांशीं नरमाईनें वागण्याचा दर वर्षांतून एकदां तरी प्रसंग येतोच. लहानपणीं आमचे मास्तर अभ्यास न करणाऱ्या मुलाला 'नापास झालास तर टांगेवाला होशील!' अशी धमकावणी देत असत. त्यावरून आमची अशी समजूत झालेली होती कीं टांगेवाल्याच्या मागें पास-नापासाचा ससेमिरा मुळींच नसतो पण ही समजूत अजिबात चुकीची आहे. विश्वविद्यालयांतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्याला, तो दर वर्षी पास होत गेला असें गृहीत धरलें तर चार परीक्षेपेक्षां अधिक परीक्षा द्याव्या लागत नाहींत. पण पुणेरी टांगेवाल्याला तो त्या धंद्यांत असेंपर्यंत दरवर्षी परीक्षा द्यावी लागते. त्यामुळें टांग्याच्या धंद्यांत शिरण्यापेक्षां 'कालिजांत' गेलों असतों तरी बरें झालें असतें असें पुष्कळ टांगेवाले दुःखानें म्हणत असल्यास आश्चर्य नाहीं. परीक्षेला बसणारा धूर्त उमेदवार पुढील निकालाचा आधीं अंदाज आल्यामुळेंच कीं काय आपण नापास होणार अस-

त्याच्या बातम्या आजूबाजूला पेरून ठेवितो; तर एकाद्या मुरलेल्या स्कॉलरप्रमाणें टांगेवाला नेहमीं ' पासालाच ' जाण्याच्या गोष्टी करूं लागतो. रामेश्वराच्या यात्रेच्या नांवावर पैसे जमविणाऱ्या कावेबाज ' यात्रेकरू ' प्रमाणें पासाला जाण्याच्या सबबीवर ' जनावराला न मारण्याबद्दलची कळकळिची विनंति तो गिऱ्हाइकांना करीत असतो. मात्र परीक्षेंतून यशस्वी रीतीनें पसार होणारा विद्यार्थी आपल्या जुन्या पुस्तकाला ज्या किंमतीनें लेखतो तितक्याच आदरानें टांगा पास होऊन आल्यावर तो गिऱ्हाइकाकडे पहात असतो. टांगेवाल्याच्या परीक्षेंत पसार होणाऱ्या टांग्यांनाही गुणानुक्रमें नंबर मिळत असतात. युनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत पहिला नंबर मिळविणारा स्कॉलर ज्याप्रमाणें पुढें आयुष्यांत कोठें तरी बेपत्ता झालेला असतो तद्वत् एक नंबरचा टांगा कोणालाही कधीं अद्यापपर्यंत दृष्टीस पडलेला नाहीं. ३३४, ५१७ असल्या नंबरचे टांगे कोणालाही कोठल्याही गल्लीच्या नाक्यावर उभे असलेले आढळून येतील.

अलीकडे पुण्यांत मोटारींची संख्या पुण्यांतील डांसाप्रमाणें वाढत चालली असल्यामुळें पुणेरी टांग्यावर संकट उपस्थित होऊन ' टांगेवाला ' ही अत्यंत लोकप्रिय पुणेरी संस्था अजिबात जमीनदोस्त होते कीं काय अशी कांहीं टांगाभिमानी टाळक्यांना काळजी पडलेली आहे. पण हें भय व्यर्थ आहे. पुणेरी टांगेवाल्यावर मात करील असा ' मोटार ड्रायव्हर ' नामक प्राणी पुणें शहरांत वाढीला लागला आहे ही गोष्ट दृष्टीआड करून चालणें जरी शक्य नसलें तरी जोंपर्यंत आमच्या सुदैवानें आमच्या दक्ष म्युनिसिपालिटीच्या डोक्यांत पुणेरी रस्त्यांवर डांबर ओतून आपल्या उज्ज्वल परंपरेला डांबर फासण्याची दुर्बुद्धि येत नाहीं, जोंपर्यंत आमच्या शहरांतील ऐतिहासिक बोळ व गल्ल्या यांचें पुराण-वस्तुसंशोधन खात्याप्रमाणें काळजीपूर्वक जतन करून पुण्याचें प्राचीनत्व प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध करण्याची म्युनिसिपालिटी आटोकाट काळजी घेत आहे, जोंपर्यंत बुधवार चौकांतून सेन्ट्रल बिल्डींगज्मध्यें दोन आण्यापेक्षां स्वस्त दरांत स्वारी नेणारें वाहन निर्माण होत नाहीं, तोंपर्यंत **' पुणेरी टांगेवाला '** ही चीज पुणेरी पगडी-जोड्याप्रमाणें पुण्याच्या वैभवाची प्रातिनिधिक निशाणी म्हणून प्रामुख्यानें अस्तित्वांत राहील यांत शंका नाहीं.



# सोन्याचा कळस

पात्रें

**चिंतोपंत**—राधाबाईचे 'हे'
**राधाबाई**—चिंतोपंतांची 'ही'
**बनी** } वडीलधाऱ्या मंडळींकडून राधाबाईंना मिळत
**सोन्या** } गेलेल्या आशीर्वादाचें एकचतुर्थांश फळ.

**आणि कांहीं इतर सटरफटर**

[ रविवारचा दिवस. कसबा पेठेंतील एका बोळाच्या तोंडाशीं असलेल्या एका जुनाट घराच्या पहिल्या मजल्यावरील एक तीन खणी खोली. आंत एका फाटक्या सतरंजीवर चिंतोपंत पसरलेले आहेत. त्यांना झोंप लागलेली दिसत आहे–किंवा ऐकूं येत आहे. खोलीच्या भिंतींना केव्हां सफेती लागलेली असावी, हा एक संशोधनाचा विषय होईल. भिंतीच्या कांहीं भागांवर राधाबाईच्या चित्रकलेचे अवशिष्ट नमुने दिसत होते, तर कांहीं भागांवर उठलेल्या रेघोट्यांवरून सोन्यानें धुळाक्षरें शिकावयाला नुकताच आरंभ केला असावा असें कोणाच्याही ध्यानांत आलें असतें. राकेल तेलाच्या दिव्यानें धुरकटलेल्या एका कोनाड्यांत एक गजराचें घड्याळ दिसत आहे. त्यांत दोन वाजलेले आहेत. डाव्या बाजूला असलेल्या दारावर राधाबाईनें केलेल्या पोतीचें तबक लावलेलें आहे व त्या तबकाच्या आड त्रिंबकरावांच्या कामाचे कागद खोंचून ठेवलेले दिसत आहेत. दारांतून पलीकडे स्वैंपाकघराचा थोडासा भाग दिसत आहे. आंतून मुलें खेळत असल्याचा आवाज ऐकूं येत आहे. ]

**चिंतोपंतः**—[ यांचा चेहरा कसा असावा हें या वेळीं दिसणें शक्य नाहीं. त्यांनीं तोंडावर आडवा हात घेतल्यामुळें फक्त थोडासा खालचा भाग—आणि त्यावर उगवलेली पांचसात दिवसांची दाढी यापेक्षां जास्त कांहींही दिसण्यासारखें नाहीं. त्यांच्या घोरण्यावरून त्यांच्या घशांत बऱ्याच गोष्टी अडकलेल्या असाव्यात असा एखाद्याचा समज झाला असता. नंतर

या बाजूचे त्या बाजूला वळतात व दुसऱ्या गालावरची वाढलेली दाढी दिसूं लागते. फिरून

अंगावर बसलेल्या माशीला फटकन् हात मारतात व डोळ्यांवरचा हात उचलून व डोळे किंचित किलकिले करून पाहिल्यासारखें करतात व फिरून पहिल्याच पवित्र्यांत घोरूं लागतात. इतक्यांत

बनी स्वैंपाकघराच्या दारांतून धांवत धांवत बाहेर येते. तिनें तांबड्या भडक कांठाचा हिरवा परकर नेसलेला आहे. अंगांत एक सैल विटकें पोलकें घातलेलें आहे—तें आईचेंच असावें बहुतेक ! डाव्या बाजूची नाकपुडी नुकतीच टोचलेली दिसत आहे. कारण ती सुजलेली दिसत आहे व तिच्यांत काळा दोरा बांधलेला आहे. नुकतेंच तोंड धुतल्यामुळें त्या दोऱ्याचें एक लोंबतें टोंक वरच्या ओठाला चिकटलेलें आहे. ]

**बनीः**—अजून नाना आपले निजलेले आहेत ! ( कोनाड्यांतील घड्याळाकडे पहात—अस्सें, बनीला घड्याळ समजतें वाटतें ! ) चांगले दोन वाजून गेले आहेत ! नाना—अहो नाना—

**चिंतोपंतः**—( घोरण्याच्या गंभीर निनादांत बनीच्या बारक्या आवाजाच्या टिमकीचा काय पत्ता लागावयाचा आहे. ! )

**बनीः**—( चिंतोपंतास दोन्हीं हातांनीं हलवीत ) नाना-अहो नाना ! उठा कीं ! दोन वाजले ना !

**चिंतोपंतः**—( झोपेच्या तारेंत ) चल निघ-वाजले तर वाजूं दे दोन ! उगाच त्रास देऊं नकोस—

**बनीः**—असें हो काय नाना ! आपल्याला सोन्याच्या कळसाला जायचें आहे ना ! आईचें सगळें आवरलें देखील !

**चिंतोपंतः**—( डोळ्यावरचा हात उचलून वेडावांकडा चेहेरा करीत घड्याळाकडे पहात ) दोनच वाजलेत ना ! अजून पुष्कळ वेळ आहे. जा तिकडे घरांत—उगीच नको माझ्या कानांशीं कटकट करूंस !

[ बनी केविलवाणें तोंड करून घरांत जाते. चिंतोपंत फिरून डोक्यावर हात आडवा घेतात व घोरूं लागतात. इतक्यांत आंतून सोन्या येतो. सोन्याची उमर चार वर्षांची असावी. एका काळीं पांढऱ्या रंगाच्या असलेल्या खादीच्या कापडाची त्यानें कोटविजार चढविलेली आहे. डोक्याला जरीची निळी टोपी असून त्याचे तुटलेले बंद दोन्ही गालावर मुंडावळ्यांसारखे लोंबत आहेत. सोन्याच्या हातांत एक चेंबटलेला बाजा आहे. ' दो आनेमें कोइबी चीज

उठाव ' मधून बहुतेक ही खरेदी चिंतोपंतांनीं आपल्या लाडक्या लेकासाठीं केलेली असावी. ].

**सोन्याः**—( बाजा मोठमोठ्यानें वाजवीत व नाचत ) आमाला नाटकाला ज्यायचं ! आमाला नाटकाला ज्यायचं ! फॅं-फॅं-हॅं-हॅं ( इत्यादि )

**चिंतोपंतः**—( चिडून अर्धवट उठतात आणि अगदीं शिवी देण्याच्या बेतांत दिसतात पण त्या शिवींत स्वतःच्या कुटुंबाचा उल्लेख होणार असल्याची जाणीव झाल्यानेंच कीं काय, ती शिवी त्यांच्या तोंडांतल्या तोंडांतच विरते, व त्यांचें अवसान ओसरतें ) हीं कारटीं म्हणजे–! काय रे ए, जातोस का नाहीं घरांत, का करूं तुझ्या बत्तीशीचा बाज्या ! घटकाभर निजेन म्हटलं तर नुसतं भंडावून सोडलं आहे कारटयांनीं !

**सोन्याः**—( एकाद्या उर्दू नाटकांतील ट्रॅन्सफर सीनप्रमाणें सोन्याच्या तोंडावरचें Expression झटकन् बदलते व बाज्यापेक्षांही भसाडया आवाजांत तो चिंचाळतो ) हां—ही–हॅं—!

**चिंतोपंतः**—बने या कारट्याला घरांत घेऊन जा पाहूं ! तिला सांग–म्हणावं पुष्कळ अवकाश आहे— ( स्वैंयपाकघरांतून आकाशवाणी उमटते )

" बने, तें पोरटें कां रडतें बघ पाहूं ? अहो, तुम्हीं तरी त्याला समजावा ना ! आतां माझें हें उरकणार तरी कधीं ? "

( आकाशवाणीची मालकीण प्रवेश करते. फिक्कट गोरा रंग, हाडकुळा चेहरा, वरची दाताची कवळी पुढें आलेली, मध्यम बांधा, ओढून ताणून वेणी घालण्याच्या संवयीनें डोक्यावरचे केस विरळ झालेले, हें राधाबाईचें थोडक्यांत वर्णन देतां येईल. गेल्या वर्षी हळदी कुंकवाच्या वेळीं प्रथम बासनाबाहेर निघालेला रास्ता त्यांनीं परिधान केलेला आहे. त्याचा खळीचा वास अद्यापि कमी झालेला दिसत नाहीं. कमरेला खोचलेल्या एका पांढऱ्या फडक्याला–हा कदाचित् रुमाल असावा–त्या ओले हात पुशीत बाहेर येतात. सोन्या त्यांच्या पायाशीं बिलगतो, त्याच्या पाठींत रट्टा मारून )

**राधाबाईः**—हो मेल्या, दूर – माझं लुगडं आणखी खराब करशील ! ( सोन्या केंकावत स्वयंपाक घरांत अंतर्धान पावतो ) काय मेली ही झोंप ! अजून पसरलांत आहांत ना ! आतां वेळ तरी आहे का निजायला—अहो, चांगलें अंडीच वाचलेत ना ! ( चिंतोपंत कांहीं न बोलतां दोन बोटें तोंडावर ठेवून जांभई देतात. व आळोखे देतात. )

**राधाबाई**:—कधीं मेलं जन्मांतून एकदां नाटकाला न्यायचं कबूल केलं तर त्याचा हा प्रकार—

( चिंतोपंत स्फूर्ति आल्याप्रमाणें एकदम पाठ खाजवूं लागतात. खाज थांबत नाहीं असें वाटतांच भर्कन् सदरा काढून उरफाटा करतात व त्यांत आपल्या खाजेचा उगम शोधूं लागतात. )

**राधाबाई**:—म्हटलं मी काय म्हणते आहे तिकडे लक्ष आहे का ? उशीर झाला म्हणजे जागा मिळायची नाहीं—

( अखेर शेवटीं चिंतोपंताना एक ढेंकूण सांपडतो. हिशेबांत एक पैची चूक सांपडल्यानंतर मारवाड्याला जितका आनंद होत असेल तितका विजयानंद चिंतोपंताच्या चेहऱ्यावर झळकूं लागतो. ढेंकणाचा निकाल पायाच्या आंगठ्यानें लावीत चिंतोपंत शांतपणें उठतात व सदरा घालूं लागतात. इतक्यांत बनी येते. सोन्या बेरडासारखे डोळे पुशीत मागून येतो. )

**बनी**:—आई, शेजारच्या यमुनाताई गेल्या देखील—

**सोन्या**:—आई, च्यल् ना लौकल—

**राधाबाई**:—अहो, आतां आटपा ना ! जायचं तर लौकर तरी जावं ! नाहीं तर न गेलेलं बरं !

**चिंतोपंत**:—( एकदम चवताळून ) तुला दिसत नाहीं का मी काय करतों आहें तें ! दरिद्री कुठली ! कधीं पाहिलं होतं का नाटक जन्मांत—

**राधाबाई**:—तुम्हीं दाखवाल कधीं तर किनई ! आज तरी नाटकाला नेण्याची कुणी बुद्धि दिली देव जाणे ! का भीक मागून कुठून पास आणलेत कोणास ठाऊक !

**चिंतोपंत**:—भीक मागायला मी तुझ्या बापासारखा भिक्षुक नाहीं !

**राधाबाई**:—पुरें बरं का ! येऊन जाऊन माझ्या बापाचा उद्धार नको—आतां घाला कोट तो ! बने, आंतलीं दारें लावलीं का बघ—[ बनी धांवत धांवत आंत जाते. ]

**चिंतोपंत**:—अन् ए, सोन्या, नाटक चालतांना जर का मधें रडलास तर थोबाडींत लगावीन चांगली—

**सोन्या**:—( कोटाच्या बाहीनें नाक पुशीत रडक्या आवाजांत ) न्या-ई-ल-ल-ना-ल [ " आहेत का मालक घरांत, " जिन्यांतून आवाज येतो. ]

**चिंतोपंतः**—( दचकून ) अरे, हा चिमणशेटच्या दुकानाचा माणूस दिसतो आहे वाटतं ! ( हलक्या आवाजांत ) ए, त्याला म्हणावं मालक गेले आहेत बाहेर —उद्यां देतील बाकी ( घाईघाईनें स्वयंपाकघरांत जातात. आंतून लगबगीनें बनी येतें तिला धक्का बसून ती खालीं पडते. जिन्यांतून एक इसम वर येतो. )

**राधाबाईः**—नाहींत ते—

**इसमः**—अरे, किती हेलपाटे घालावे आमी ! जवा तवा नाहीं ! आज सुट्टीचे बी घरी नाय म्हजे काय ?

**राधाबाईः**--बाहेर कामाला गेले आहेत ते ! उद्यां या तुम्हीं–!

**इसमः**—अरे, उद्यांची बात आज महिनाभर आमी सांभळली ! अजून एक छदाम बी दिली नाय म्हणजे काय ! आणि आतां तुमच्या इथच बसते सांज होई तंवर ! ( बसण्याचा आव आणतो. राधाबाई केविलवाण्या चेहऱ्यानें घड्याळाकडे पाहतात. तीन वाजून दहा मिनिटें झालीं आहेत. )

**राधाबाईः**—हें बघ, आम्हाला जायचं आहे बाहेर ! नायका मंडळींना त्रास देण्याचं तुला कारण नाहीं ! तूं आपला उद्यां ये आणि त्यांच्याशीं काय बोलायचें तें बोल !

[ तो इसम कांहीं तरी ओठांतल्या ओठांत पुटपुटतो व नंतर कांहीं तरी निश्चय केल्यासारखा चेहरा करतो ! ]—

**इसमः**—बरं तर आमी जातो. उद्यां तेना म्हणावं बाकी दुकानांवर चुकती केली नाय तर आम्ही फिर्याद करेल ! ( पाय आपटीत निघून जातो. चिंतोपंत स्वैंपाकघराच्या दारातून हळूंच डोकावतात. )

**राधाबाईः**—गेला तो ! आतां आटपा लौकर ? सव्वातीन झाले !

**चिंतोपंतः**—( जोरांत बाहेर येतात ) फिर्याद लावीन म्हणाला काय तो तीनशेंड्या ! ( जिन्याकडे पाहून मुठी वळीत ) अरे जा लेका ! तुझ्यासारखे छप्पन पाहिलेत मी—

**राधाबाईः**—जाऊं द्या ना आतां ! बांधा रुमाल डोक्याला—नाहीं तर दुसरं कोणी यायचं ! ( जिन्यावर फिरून पावलें वाजतात ) अग बाई ! आलं कुणी ! का तोच मारवाड्याचा माणूस परतला कोणास ठाऊक ?

[ चिंतोपंत डोक्याला रुमाल बांधीत स्वयंपाकघराकडे धांव घेतात. राधाबाई जिन्यांत डोकावून बघतात. " आहे का चिंतू ? " कोणी तरी विचारतें. ]

**राधाबाई**:—( चटकन् वळून मागें येतात. ) अरे देवा ! काका आले झाली आतां दोन तासाची निश्चिति ! कोणता मुहूर्त लागला आहे नाटकाला जायचा आज कोणाला ठाऊक ! ( घाईघाईत स्वैंपाकघरांत जातात. चिंतोपंत लगबगीनें बाहेर येतात. )

**चिंतोपंत**:—( दांत दाखवून ) या काका !

[ काका या नांवाला सर्वस्वी शोभतील अशा पोषाखाचे व वयाचे एक वृद्ध गृहस्थ हशहुश करीत आंत येतात व संतरंजीवर मांडी ठोकून बसतात. ]

**काका**:—( बिनदातांच्या बत्तिशींतून उमटेल अशाच आवाजानें ) काय रे, आहेस ना ! म्हटलं कुठं, बाहेर बिहेर गेलास कीं काय ?

[ घड्याळांत साडेतीन वाजतात. चिंतोपंतांच्या चेहऱ्यावर देखील आतां हालचाल सुरू होते. दांत विचकून हंसल्यासारखे ते दाखवतात व वर आढ्याकडे बघून तुळ्या मोजूं लागतात. ]

**काका**:—मी चाललों होतों इकडून. म्हटलं बघावं आहेस का घरांत ! चहा तरी कपभर देशील ना आम्हांला !

**चिंतोपंत**:—बने, आईला म्हणावं तुझ्या, चहा आण लौकर !

[ बनी आंत जाऊन ताबडतोब बाहेर येते. ]

**बनी**:—आई म्हणते चहाचा पुडा संपला सकाळींच !

**काका**:—अग संपला तर घेऊन ये कोपऱ्यावरच्या दुकानांतून ! आपण चहा घेतल्याशिवाय नाहीं हालणार बरं का चिंतू, इथून !

( चिंतोपंत बनीला दोन आणे देऊन चहाचा पुडा आणावयास सांगतात व घड्याळाकडे पहात अस्वस्थपणें फेऱ्या घालूं लागतात. )

**काका**:—बाकी ( खोकत ) चहा घ्यावा म्हणजे त्या फरशीवाल्यांच्या हॉटेलांत बरं का चिंतू ! असा फर्मास चहा तिथें न् काय !

( चिंतूच्या चेहऱ्यावर यावेळीं कस्टर्ड झालेलें असतें ! घड्याळांत पावणेचार होतात. अरे बापरे ! नाटक आतां सुरू झालें असेल नाहीं ! चिंतोपंत चटकन् स्वयंपाकघरांतून जाऊन येतात ! इतक्यांत बनीही ' जाकुजा ' चा पुडा घेऊन धापा टाकीत येते )

**काका**:—अन् काय रे चिंतू, तुमच्या हपिसांतल्या त्या रानड्यांची म्हणे बदली झाली आहे म्हणून मी ऐकलें ! तो रानडे म्हणजे आमच्या त्या बंडोपंत खऱ्यांचा भाचा बरं का ! कोणते बंडोपंत खरे आलं ना ध्यानांत !

**चिंतोपंतः**—( भकास चेहऱ्यानें पहात ) म्हणजे आपले तेच म्हणतां ना तुम्हीं ! आहेत मला ठाऊक. ( ओरडून ) बने, आण की चहा लवकर—

[ बनी एका पितळेच्या बशींत कानतुटका चिनी मातीचा कप घेऊन येते व काकांच्या पुढें ठेवते ]

**काकाः**—अन् तुला रे ?

**चिंतोपंतः**—आमचा झाला चहा मघांशींच !

[ काका शांतपणें चहा फुंकून पिऊं लागतात. 'चांगला याच्या नरड्यांत चहा ओतावा' अशा आविर्भावानें चिंतोपंत त्यांच्याकडे बघतात. स्वयंपाक-घराच्या दाराआडून राधाबाई एकसारख्या पहात असतात. शेवटीं संपतें एकदांचें काकांचें चहापान ! बाकी घड्याळाकडे पहाण्याची आतां चिंतोपंतांची छातीच नव्हती. ]

**चिंतोपंतः**—( कमाल आहे या चिकट थेरडयाची अशा विचारानें ) बने, अग सुपारी आण आंतून !

**काकाः**—चिकणी असेल तर बरी ! [ या वेळीं चिंतोपंतांनीं आपल्या कल्पनासृष्टींत काकांचें नरडें दाबलें होतें ! बनी सुपारी आणून देते. ]

**काकाः**—( सुपारी चघळीत ) बरं, मग येतों मी तर ! अन् त्या रानडयाचे बदली कोण आला आहे दुसरा [ 'तुझा बाप' अशा अर्थाचे शब्द चिंतोपंत मनांत पुटपुटतात. काका काठी टेकीत जिन्यांतून उतरूं लागतात. कलकत्याच्या अंधारकोठडींतून एखादा साहेब जिवंत बाहेर आला असता तर त्याचा चेहरा कसा झाला असता तशी मुद्रा धारण करून राधाबाई स्वयंपाक-घरांतून बाहेर येतात. ]

**राधाबाईः**—चार वाजवले या थेरडयानें ! आतां कशाचं नाटक न कशाचं काय !

**चिंतोपंतः**—आतां तूं बडबडूं नकोस ! चल उचल त्या कारट्याला आणि हो पुढं ! बने, चल लाव त्या खिडक्या—

**राधाबाईः**—सोन्या, मेल्या तोडल्यास का कोटाच्या गुंडया ! कारटं एक कपडा धड ठेवील तर शपथ ! उठ !

[ सोन्या इतका वेळ गंभीर चेहरा करून मांडी घालून शांतपणें बसला होता. इतका शांतपणें बसलेला त्याला कोणीच पाहिला नसेल. ]

**राधाबाई**:—मेल्या, उठतोस की नाहीं ! ( सोन्या रडका चेहरा करतो. )

**चिंतोपंत**:—उचल कीं त्याला, उगाच वेळ नको घालवूस आणखी ! ( राधाबाई सोन्याला हात धरून अर्धवट उठवतात. सोन्या चेहरा वेडावांकडा करून एकदम हंबरडा फोडतो. )

**बनी**:—( सोन्याच्या विजारीचा पाठीमागील भाग दाखवित तोंड चमत्कारीक करीत ) अग–आई–तें बघ—

( चिंतोपंत खुनी माणसाच्या दृष्टीनें सोन्याच्या पार्श्वभागाकडे बघून दांतओठ चावतात. )

**राधाबाई**:—तरीच म्हणतें हा हुणगोबा बसला काय मघापासून निवांत ! पांच वर्षाचें कारटं झालं तरी ( त्याच्या पाठींत रपाटा मारण्यासाठीं आवेशानें जातात– )

**बनी**:—अग आई, पण तूं त्याला सकाळीं एरंडेल दिलं होतंस ना ?

[ संसार असार आहे अशा अर्थाचा चिंतोपंत चेहरा करतात. ]

**राधाबाई**:—( एकदम हंसून ) इश्श ! अग, खरंच कीं ग ! काय धांदरट मी तरी ! मी अगदीं विसरूनच गेलें कीं ! आत्तां लागू झालं वाटतं एरंडेल ! ( चिंतोपंतास ) हें बघा, तुम्हाला जायचं असेल तर जा नाटकाला तुम्हीं ! मला आतां नाहीं येतां यायचं ! बने, चल ग घरांत पाणी घालायला ! ( राधाबाई सोन्याला अधांतरी उचलून घरांत नेतात. )

**बनी**:—( रडका चेहरा करून स्वयंपाकघरांत जातां जातां ) नाना, नाहीं जायचं आपल्याला ‘ सोन्याच्या कळसाला ’ ?

**चिंतोपंत**:—या सोन्याचा शेवटीं असा कळस केल्यानंतर त्या सोन्याच्या कळसाला जाण्याचं आतां कारणच नाहीं ! ( खिशांतील पास काढून शांतपणें ते फाडतात व त्याच्या चिठोऱ्या खिडकीबाहेर फेकून देतात. बनी डोळे पुशीत स्वयंपाकघरांत जाते. ( चिंतोपंत दांत कोरण्यानें दांत कोरूं लागतात. स्वयंपाकघरांतून सोन्याच्या रडण्याचे सूर ऐकूं येतच असतात ! )

**चिंतोपंत**:—( कांहीं वेळानें स्वयंपाकघराच्या दाराकडे कौतुकानें पहात ) सोन्या, बेट्या तूं तर कळस केलास आज ! ( इतक्यांत जिन्यावर पावलें वाजल्याचा भास झाल्यामुळें चिंतोपंत धांवत स्वयंपाकघरांत जातात. खेळ खलास. )

---